# आंदोलन

लेखक

का. कृ. वैटणकर

प्रकाशक

महाराष्ट्र-ग्रंथ भांडार,

गिरगांव-मुंबई

१९४० च्या कामगार-संपांत भाग
घेऊन कारावास भोगून आलेल्या
कम्युनिस्ट कार्यकर्त्यांस—

मागच्या साम्राज्यशाही युद्धाच्या पार्श्वभूमीवर आधारलेली:

प्रेम, जीवन, लढा व कारावास यांतून धांवणारी

ही एका युवकाची प्रासंगिक आत्मकथा आहे.

कथेचा घटनाकाल ३० सप्टेंबर

१९३९ ते ३० मार्च

१९४० पर्यंतच

घे त ला

आहे.

*

# १

डेन !

किती खेळकर होते तिचे ते नयन ! अन् किती विशाल ! जिवंत मानवानाच काय पण मेलेल्याना सुद्धा धरणीवर आणून असामान्य कर्तृत्वाचे नि प्रीतीचे खेळ खेळवून घेण्याची विराट् शक्ति होती त्याच्यांत !

तिचे ते गौर फुगीर गाल, रसरसलेले उघडे बाहु व जिवणीवरील कधींही न विरणारें तें स्मित ! किती अबोल प्रशंसा करीत होतें तिच्या मुग्ध स्वभावाची तें !

तिचें तें आकर्षक वक्षःस्थल किती बेदरकारपणें यौवनाची भाषा बोलत होते !

आणि तिची ती अति आकर्षक केशभूषा किती उन्मादानं स्त्रीसुलभ करारीपणाची साक्ष पटवून देत होती !

डेन आली.

असंख्य तारका चमकल्याचा मला भास झाला. ती बोलूं लागली. स्फटिकवत् ओढाळ पाणी वाहण्याचा तिनं आभास उत्पन्न केला.

पण त्या दिवशीं तिनं घेतलेला तो एकच हट्ट म्हणजे मेनकेनं इंद्रापाशीं केलेल्या, जगात उतरून ऋषींना ध्येयच्युत करणाऱ्या मागणीसारखा मला वाटूं लागला.

'ए जिम्, आज चल ना रे माझ्याबरोबर नाचाला.'

'काय डेन, आता मला तूं नाचायला लावणार ? अन् तें कुठं ?'

'रेनबो क्लबमध्ये. चल, वेळ करूं नकोस. बघ बरं, तुझं नि माझं तिकिट सुद्धा रिझर्व्ह करून आलें आहें मी.'

'वा: ! अगदींच खुळी पोर आहेस तूं. काय ग, माझं तूं नाव बदललंस म्हणून तुझ्या समाजांतले सर्वच आनुवंशिक गुण मला लाभतील अशी कल्पना आहे की काय तुझी ? डेन, खरंच मला तिथं नाचणं इतकंसं जमणार नाहीं. जाऊं दे ना ती गोष्ट !'

'जिम कसा रे अरसिक तरुण आहेस तूं. नाचाला नाहीं म्हणतोस ! तारुण्याची ज्यात ऊर्मि भरलेली आहे–ज्यात यौवनाचा वसंतबहर फुललेला

आहे, अशा ठिकाणीं यायला तूं नाकारतोस! तुझ्याच समाजातल्या पुराणकालीन नर्तकींचा तुला अभिमान वाटतो ना? तो आदर्श तूं पुढें ठेवतोस नि त्याला कला कला म्हणून गोंजारतोस. आमच्या समाजात त्याच कलेचा सामाजिक रूढीच्या नावाखाली केलेला गोड प्रचार आहे हा. मनाला आनंद देणारी नि तरुणाची मनं बेभान करणारी कला आहे ती. जिम तूं नाही म्हणू नकोस. तुला आलंच पाहिजे माझ्या बरोबर!'

'ते सर्व खरं आहे, पण मला त्यात भाग घेता येणार नाही डेन. तिथं सर्व मुली मला तुझ्यासारख्या दिसतील पण तरुण मात्र माझ्यापेक्षां सर्व निराळे असतील. अन् नाचाकरिता एक पाऊलही उचलण्याची माझ्यात इतकी हौस राहिली नाहीं.'

'बरं! आहे मला ते सर्व माहीत. ती सर्व व्यवस्था मी करीन. हं कुठं आहे तुझा तो टाय नि तुझा तो टप् टप् वाजणारा बूट? कर ना पोषाख लौकर. हे बघ आता नऊ वाजले आहेत न् सव्वा दहाला तर ऑपेरा सुरू होईल ना!'

असं म्हणतच तिनं मला उभे केले. मी तिच्याकडे बघितलं. तिच्या नयनात निश्चयाचं पाणी चमकत होतं नि तिच्या प्रत्येक वागणुकीत व हाव-भावात ती करून आलेला पक्का विश्वास प्रगट होत होता.

काळ्याकुट्ट अज्ञानाच्या मनःस्थितीतून मी विचाराची एक शलाका घेऊन उभा राहिलो. माणसाच्या भोवती कितीतरी दिव्यानंदाचे क्षण विखुरलेले असतात. पण त्याच्या त्या विकृत कल्पना, संकुचित जीवनामुळें त्याच्यात आलेली अज्ञानता, अशा किती तरी सुंदर नि विलासी प्रसंगापासून त्यांना मागें मागें ओढतात. माझ्यापुढे डेननं उभा केलेला हा कार्यक्रम लोभनीय तर खासच! पण का कुणास ठाऊक त्याचा आस्वाद घेण्याच्या कल्पनेनं एकीकडे गुदगुल्या होत होत्या तर दुसरीकडे छातींत भयानक धडधड होत होती.

तसं पाहिलं तर आम्हीं तिसऱ्या वर्गातूनच प्रवास करावयाचा. पण ह्या वीस पंचवीस मिनिटातच आमच्या नाचाची तालीम होणार होती. त्या रात्रीच्या वेळेस एकही पहिल्या वर्गाचा भाग्यवान् प्रवासी आमच्या सुदैवानं डब्यांत फिरकला नव्हता. कधीं कधीं संधिही अशा जमून येतात

कीं ज्या पुढच्या स्वप्नाळू जगांत रमून जाण्यास तादात्म्य पावतात.

दादर स्टेशनातून गाडी निघाली. ती मला घेऊन नाचण्याच्या चार चार, पाच पाच पावलाचे धडे देऊं लागली. माझ्या मनात तिच्या पावलेल्या प्रेमसमाधीन मीहि ती जे जे सांगेल तें ते एखाद्या कळसूत्री बाहुलीप्रमाणे करूं लागलो !

पण माझी दृष्टि पावलाकडे नव्हती. ती तिच्या भरीव छातीवरून गौर चेहऱ्यावर आळीपाळीनं फिरत होती.

तिच्या ते लक्षात आलं. ती हसली. 'जिम, नाचणं म्हणजे काहीं फुगड्या खेळणं नाहीं बरं का ? समज एखादी दुसरी मुलगी तुझ्याबरोबर नाचूं लागली नि तू तिचं सौंदर्यपान करूं लागलास तर तो एक सोशल ब्लेम ठरतो आमच्यात. नाचताना ज्या बाजूला हात वळतील त्याच बाजूला चेहरा वळला पाहिजे. अन् हे बघ, जी तुला आपल्या नाचात जोडीदार घेईल, तिच्याशी तूं अशा रितीनं नाचायचं की, जणूं काय तूं फक्त एखाद्या यंत्राप्रमाणे आर्केस्ट्राची तालबद्धता टिकवीत आहेस.'

'आता तर तू अगदी कमालच्च केलीस डेन. तुझ्याबरोबर नाचायचं मीं कबूल केलं आहे. दुसरीबरोबर नाही.'

'हो. ते खरं आहे. पण तिथं पुरुषाला निवडण्याचा हक्क प्रत्येक स्त्रीला आहे. माझ्याबरोबर नाचल्यानंतर पुन्हा तुला एखाद्या मुलीनं पाचारण केलं तर तुला नाही म्हणता उपयोगी नाही.'

'अरे बापरे ! मला नाही जमायचं तें डेन. 'मरीन लाईन्स' स्टेशनवर मी तुला सोडेन नि मी आपला परतेन घरीच कसा !'

ती माझा हात धरीत नि आपल्याकडे मला ओढीत म्हणाली, 'वाः रे वा ! जिम, सशाची जिवंत शिकार करून त्याला पाळायला आणलं म्हणजे तो जसा चुळबुळ करतो नि धावा मारायचा प्रयत्न करतो तसाच तूंही माझ्यापासून दूर दूर पळण्याचा प्रयत्न करीत आहेस जिम, नाहीं ?'

'म्हणजे ? मला नाहीं समजलं, पण स्त्री ही शिकारी अन् पुरुष हा तिची शिकार आहे, असंच तुला पटवून तर नाही ना द्यायचं डेन !'

'आणि असंच नाही का जिम, पुरुषांना कर्तृत्वाचे आखाडे जिंकण्याला नि त्यांना उंच उंच चढवायला स्त्रियाच नाहीं का कारणीभूत

झाल्या ! '

' छेः ! स्त्रिया कारणीभूत झाल्या असतीलहि कदाचित्. पण जगांत झालेल्या नि असलेल्या थोर विभूतींचे इतिहास हेंच सागतात की ध्येयवादी तरुणांच्या जीवनात स्त्री ही क्षणकाल उठणारा गोड तरंग नि रम्य स्वप्न आहे. '

' हो. पण त्या क्षणकालच्या गोड तरंगावर नि रम्य स्वप्नानेच तर त्यांनी लढाया जिंकल्या आहेत ना ? जाऊं देना जिम. तुला एकदां असल्या प्रकारच्या नाचाची गोडी लागली की नाही म्हणजे मग तूं सोडणार नाहींस एकही नाच मला घेतल्या शिवाय. '

मरीन लाईन्सच्या स्टेशनवर त्या काळोखांत वेगानं घुसणाऱ्या लोकल-कडे कृतज्ञतेचा दृष्टिक्षेप टाकून आम्ही स्टेशनबाहेर पडलों.

स्टेशन ओसाड पडलं होते. म्हातारपणीं आपले सर्व नातलग नि आप्तइष्ट सुटून गेलेल्या माणसाच्या आयुष्याप्रमाणें भासत होतें. क्वीन्स रोड वैधव्याची साक्ष देत होता. त्यावरून एखादीच जाणारी मोटारची भरारी वैधव्यांतील प्रेमभंगाचा मासला दाखवीत होती. एकाच बाजूच्या उंच उंच इमारतीवर कोणत्या तरी आगामी दुःखाची काळी छटा दिसूं लागली होती. आणि ती विपत्ति दाखविण्याकरितांच कीं काय मधून मधून कांहीं कांही अंतरावर लाल दिवे चमकत होते. असे विचार येताच माणूस माण-साच्या निकट साहचर्याची अपेक्षा करतं. मीं जवळ पाहिलं, डेन माझ्या लगत होती. तीहि स्तब्ध होती. मला वाटलं तिच्याही मनांत अशीच कालवाकालव चालली असेल काय ?

' डेन, आपण किती वेळांत पोहचूं तिथं ? '

ती आपल्या नेहमीच्या सरावाप्रमाणें आपल्या डाव्या हाताचा त्रिकोण माझ्या उजव्या हातात अडकवीत म्हणाली, ' काय घाई आहे त्याची ! आपण सावकाश जाऊं. अशा गर्दीच्या ठिकाणीं ज्याला आपलं व्यक्ति-वैशिष्ट्य दाखवायचं असेल त्यानं अगदीं शेवटच्या घडीला आंत प्रवेश करावा आणि कार्यक्रम संपण्यापूर्वींच सर्वांच्या आधीं बाहेर पडावं. आपल्या पोषाखाची ऐट दाखवायची नि उंच्या पुऱ्या व्यक्तित्वाची सर्वांना जाणीव करून द्यायची तीच तर वेळ असते जिम ! '

सरासरी वीस मिनिटांच्या आंतच आम्हीं एका प्रशस्त आवारांत प्रवेश केला. आत दाखल होताच कुठून तरी दहा वाजण्याचे ठोके पडूं लागले.

'हे ठोके पडत आहेत कुठल्या घड्याळाचे डेन?'

'चर्चेच्या. आपल्याला अजून या दोनी तर्फा लागलेल्या झाडींतून थोडंसं लांब जायचं आहे.'

तेथून जाताना आम्ही काही पुढे जाणाऱ्या नि मागून येणाऱ्या स्त्री-पुरुषाप्रमाणे अंगाला अंग घाशीत नि इंग्लीश संगिताच्या हाः हाः हुः हूःच्या ताना घेत एका भव्य बंगलीशेजारी येऊन उभे राहिलो.

× × ×

आत आम्ही प्रवेश केला. निराळ्याच जगात प्रवेश केल्याचा मला भास झाला. तिथ डेनशिवाय एकही चेहरा माझ्या ओळखीचा नव्हता. अशा अनोळखी ठिकाणी वागण्यात जो बेदरकारपणा उत्पन्न होतो त्याचा मी मनमुराद अनुभव घेवूं लागलों.

अंधाऱ्या रात्रीचं बाहेरचं ते कुंद वातावरण! आत येताच त्यांत बदल झाला. समप्रमाणात वाऱ्याचे झोत अगावर वाहूं लागले. जणु काय डेनसारख्या सहस्र कुमारिका मला स्पर्शसुख देत आहेत. आणि तो प्रकाश-किरणाचा चकचकाट नि त्यात उंची उंची पोषाखात बसलेल्या तरुण तरुणी असंख्य रंगाची फुलं खुलावीत तशा मला दिसूं लागल्या.

कथा-पुराणातल्या इद्र नि राजे-महाराजे याच्या दरबारातल्या नाचांचीं वर्णनं मी ऐकली होतीं. इंग्लिश वाङ्मयातल्या परींची वर्णनेही मीं हपाप-लेल्या मनानं वाचली होती. पण ह्या थियेटरात पाहिलेल्या सत्यापुढें तीं सर्व वर्णने अंधूक नि अविचल वाटूं लागली. त्या वर्णनात ईश्वराबद्दलची मादक नशा श्रोत्याना पाजली जात आहे तर ह्यात भावनेच्या कर्तृत्वाचा जिवंत साक्षात्कार नि अहंकार भरलेला आहे.

आम्ही एका कोचावर बसलो. मीं सभोवार पाहिलें. सबंध थिएटरांत निरनिराळे कोन साधून इंद्रधनुष्यासारखा प्रकाश पाडण्यांत आला होता. डायसवरल्या मुख्य पडद्यावर एक मोठं इंद्रधनुष्य रंगविलं गेलं होतं व

त्यावर '**रेनबो क्लब**' ही ठळक अक्षरें निरानिराळ्या रंगांत उठावदारपणें कोरलेलीं दिसत होतीं.

चार सभ्य लोक जमले म्हणजे ज्या शांततेचा आव आणतात ती शांतता तिथं नांदत होती. नयनाचा खेळ चालला होता. हास्यानं नि स्मितानं त्याचा स्वीकार होत होता.

आम्ही जागा घेताच मी सभोवार दृष्टि फिरविली. सर्वजण आमच्या-कडे बघूं लागले होते. डेनने आपल्या काही ओळखीच्या लोकांशीं बस-ल्याच जागेवरून बोलण्याचा सपाटा लावला होता. तिथं जमलेल्या सर्व मंडळींत ख्रिश्चन फारच कमी. ॲंग्लो इंडियन नि पारशी ह्यांचाच जमाव प्रामुख्यानं जास्त दिसत होता. त्या उन्मादक सेंटच्या वासानं माझं मस्तक भणाणूं लागलं. मी पुन: एकदा सभोवार नजर फिरविली. मला कसंसंच वाटलं. एकूण ख्यालीखुशाली करणाऱ्या नि दोन मजेचे क्षण सुखात काढणाऱ्या भांडवलदाराच्या खाईत मी येवून पडलो होतो तर!

मी डेनकडे बघितलं. ती आज फारच सुंदर दिसत होती. तिनं जरीचा ब्लाऊझ घातला होता. अन् तपकिरी रंगाच्या तलम जॉर्जेटमधून तिची गौर देहलतिका मोहवश दिसत होती.

'डेन, फारच खुशींत दिसतेस तूं आज.'

'जिम, तूं माझ्याबरोबर आलास म्हणून मला किती आनंद होत आहे.'

'मला मात्र तो होत नाही. तुला या क्लबात शिरकाव मिळाला कसा? आणि आज इतक्या स्वर्गीय मनरंजनाची तुला गरज भासली कशी?'

ती आपली दृष्टि माझ्यावर स्थिर करीत म्हणाली, 'तसा काहीं माझा या क्लबाशी संबंध नाही. पण तू हे असं का विचारतोस?'

'तसं नव्हे ग. पण तुझा नि या क्लबाचा तसाच काही गाढ संबंध असला तर तुझ्या मताला भ्रष्टता आली आहे असं मी समजेन.'

'मधून मधून नेहमीच गंभीर बनतोस बरं का जिम तूं. त्यात कसली आलीं आहेत मतं नि भ्रष्टता. जेव्हा समाजांतले कांही लोक करमणुकी-करितां एकत्र येतात तेव्हा त्यातून आपल्या मनाला रिझवायचं नि दुस-

त्यांना आनंदाचा लाभ घडवून द्यायचा ही एकच भावना असते जिम अशा वेळी इथं.'

'बरं. बरं बुवा. तूं म्हणशील तसं!' असं म्हणत मी खिशात सिगारेट काढण्याकरिता हात घातला. पण नंतर तोच हात डेनच्या खांद्याभोंवती कोचावर ठेवीत नि पाय जरा लांब करीत मी डेनला म्हणालों, 'अगदींच धादरट आहेस डेन तूं. येथे येण्याच्या गडबडींत 'पासिंगशो' चं पाकीट मी विसरून आलो घरींच!'

डेन मला उत्तर देणार तोच एक मुलगी आपल्या पाटीवरला भरदार नि लांबा शेपटा छातीवर घेत माझ्याकडे पहात नि डेनकडे हंसत हंसत आली. कोचावर लांब टाकलेला हात मी आवरून घेतला नि जरा सावरून बसलों. ती डेनच्या कानापाशी जाऊन काही तरी बोलूं लागली. माझ्या छातीत धडकी भरली. मी कोण आहें, हे डेनने तिला सांगितलं तर! पण मी येताना तिचं वचन मागून घेतलं होतं, 'डेन, बरं तर मग मी येतो तुझ्या बरोबर पण एका अटीवर. माझ्याबद्दल काहीएक सांगायचं नाहीं तिथं.' तिनही कबुल केलं होतं कीं, 'मी सांगेन हा माझा पाहुणा नि आजच्या नाचातला माझा जोडीदार आहे म्हणून.'

ती तरुणी परतली. डेन माझ्याजवळ सरकली. मी आपली बैठक पूर्ववत् घेतली. एका मधुर आवाजात पडदा सरकूं लागला. आर्केस्ट्राची तालबद्धता सुरू झाली.

'चल बघ उठ ना जिम. आता आपली वेळ आली ना नाचाची' असं म्हणत डेननं कोचाच्या पाठीवर तिच्या गळ्याभोवतीं असलेला माझा हात धरीत नि त्याच हातावर हालवीत मला उभं केलं.

मी उठलो. तेथेच बुटाच्या आवाजाचा टणत्कार करून पाहिला. त्या आवाजानं मला शिरीनची आठवण झाली. पण ती आठवण होताच मी जरा भांबावलों आणि लागलीच एका आवेगानंच डेनच्या कटीभोवती माझ्या उजव्या हातानं मिठी घातली. तिनंही आपला डावा हात माझ्या गळ्यांत घातला. अशा पावित्र्यात आम्ही डायसवर आलों.

मी डायसवर येताच आपलं व्यक्तित्व विसरलों. किती यौवनमदानें बेभान होऊन नाचलों होतों मी तिच्या बरोबर!

डेननें माझी पाठ थोपटली. ‘ मित्रा, किती रे सुंदर नाचलास तूं. एकूण शिरीननें तुला ह्यांतही इथपर्यंत पटाईत केलं होतं तर. अहाहा ! अन् येतांना काय पण नाटक केलंस ? म्हणे मला जमणार नाही तें ! ’

‘ अं हं. डेन, अजूनही मला ते पटत नाही. मी इतकं चांगलं नाचलों असेन त्याचें कारण कोणत्याही भूमिकेशी तादात्म्य होण्याची नि आनंदाचे क्षण आत्मसात् करण्याची मला सवय आहे. ’

पुढचा नाच सुरू होण्याकरिता आता वीस मिनिटांची विश्रांति होती. डेन आपल्या काही ओळखीच्या मुलींशीं बोलण्यात रंगून गेली होती. मी जागेवर जाऊन बसलो होतो.

मघाशी डेनकडे आलेली ती तरुणी माझ्यासमोर आली नि मला म्हणाली, ‘ क्षमा करा. पण आता होणाऱ्या नाचात मी तुम्हाला माझा जोडीदार नेमायचं ठरविलं आहे. ’

केवढ्या निर्भयपणे नि सहज उद्गार काढले तिनं ते !

मी दमलो होतों. डोळ्यावर गुंगी येऊं पहात होती. मी तिला तसं सांगणार होतों अगदी. पण तिच्या त्या गोड बोलण्याने माझ्या तोंडून होकार निघाला !

‘ तुमची तशी इच्छा असल्यास मी तयार आहें. ’

‘ चला तर मग आपण पेय घेऊं. ’

तिने अगदी सहज खेळकरपणानं–जणु काय एखाद्या आपल्या मैत्रिणीलाच घेऊन जात असल्यासारखा–माझा हात आपल्या हातात घेतला. ती मला घेऊन गेली.

आम्ही जेव्हा परतलों तेव्हा ती मला म्हणाली, ‘ खरंच फारच सुंदर नाचलात तुम्ही. आमच्या घोळक्यात सर्वच मुली तुमच्याशीं नाचायला तयार आहेत. पण तुमचं तें दांडगं व्यक्तित्व नि अबोल स्वभाव पाहून तुमच्याकडे यायला सर्वच कचरत होत्या. केवळ डेनच्या मैत्रीमुळें मी तुमच्यापाशीं येवून येवढी हिंमत केली. ’

मीं मोठ्यानं हंसत नि तिचा मऊ हात माझ्या हातात दाबीत म्हटलं, ‘ ओ हो, मी अभिनंदन करतों तुमच्या त्या निर्भयपणाचं. ’

आपण विजय मिळविला असं समजून ती छोकरी–आधीच यौवन-

मद नि त्यांत हा अहंकार–आपल्या घोळक्यात परतली.

डेन जागेवर येवून बसली होती. मला पाहतांच ती उठली नि म्हणाली, 'किती शोधीत आहें मी तुला जिम. चल ना आपण थोडंसं मद्य घेवून येऊं.'

त्या लोजमध्यें मीं तिला गंमत सांगितली त्या मुलीची. पण तें ऐकून घेतल्यानंतर ती थोडीशी गंभीर झाली. हास्याचं अवधान आणीत म्हणाली, 'ओ हो! छान! नशिबवान आहेस तूं जिम. पण जरा सावध अस हो. ती तुझी काहीं ही डेन नाही बर का?'

त्या नवीन मैत्रिणीचा गुबगुबीत हात दाबीत मी डायसवर प्रवेश केला. बायरनची प्रेमकाव्ये आर्केस्ट्रातून निनादूं लागली.

त्या छोकरीन त्याच गाण्यातून माझ्यावर नेत्रकटाक्षाची मोहनी घातली आणि मलाही कविवर्य तांबे याची ती कविता—

**'क्षण हाच जवळ ये तूं पण गे'**
**'मग विसर हवा तर हा क्षण गे'**

वारंवार आठवूं लागली. तिच्याबरोबर नाचण्यात मी तल्लीन झालों. पण जी मजा डेनबरोबर नाचण्यात मला वाटली होती, त्याचा प्रत्यय काही त्या वेळेस मला आला नाहीं. किती सुंदर होती ही पोर! मग का न यावे नाचता मला तिच्या बरोबर नीट? डेनची बसल्या जागेवरून माझ्यावर खिळलेली नजर की तिचे ते उद्गार 'जिम सावध अस हं तिच्यापासून.'

आर्केस्ट्रा थाबला नि पडदा सरकला. खणखणणाऱ्या नाण्याच्या आवाजासारखा साऱ्या तरुण स्त्रीपुरुषाचा आवाज साऱ्या थियेटरांत उंचाऊं लागला.

डेननं माझं नि त्या मुलीचं हंसून स्वागत केलं आणि माझे दोन्ही हात हातात घेत ती म्हणाली 'तुला बरेच श्रम पडले ना जिम, तूं फारच भिडस्त आहेस. किती दबकत दबकत नाचलास ह्या वेळेस तूं.' आम्ही तिघेंही बोलत बोलत बार रूमकडे वळलो.

आम्ही तिघंही जागा पाहून बसलो.

'मद्याचे प्याले मात्र मीच भरीन हं!' त्या नवख्या मुलीनं डेनला इशारा दिला.

तिनं तीन प्याले भरले.

मी माझा प्याला तिच्या हातांतून घेतला.

ती आपला प्याला माझ्या प्याल्याला लावीत म्हणाली, "Yo the Health of one nearest to your heart"

त्याच वाक्याचे पडसाद घेत, त्या दोघीकडे पहात नि तिच्यावर नजर रोखीत मी प्याला ओठाला लाविला व म्हणालो "and to our new acquaintance."

नंतर डेननेही त्याचीच पुनरावृत्ति केली.

उडालेली झोप पण मद्यानं आलेली नशा. तरुणीचा मादक सहवास पण त्यातून दूर दूर पळणारं माझं मन. मला या सर्व गोष्टीचा आतां वीट आला होता.

मी कपाळावर आठ्या आणीत नि जरा त्रासिकपणानेच डेनला घरीं चलण्याबद्दल म्हटलं. तिचा मानस अजून बॉलमध्ये भाग घेण्याचा नि मला थकविण्याचा होता अन् त्या मुलीच्याही मनात तसेच विचार चालले असावेत असा तिचा चेहरा सांगत होता. पण 'मी आता इथं एक मिनिटही थांबायला तयार नाही' असं जेव्हां डेनला निक्षून सांगितलं, तेव्हां कुठं ती घरी परतायला तयार झाली.

आम्ही थिएटरच्या मागल्या बाजूने रस्त्यावर आलों. टॅक्सी बोलवली. दीड वाजून गेला होता. त्या मुलीशी डेननं हस्तांदोलन केलं. पण तिच्या डोळ्यात आर्तता होती. काहीतरी असमाधानाची झाक तिच्या चेहऱ्यावर झळकत होती.

ती डेनवर रागावून पहात म्हणाली, 'पेरीन, काय ग मुलगी आहेस तूं! माझी नि ह्याची ओळखही करून दिली नाहीस तूं अजून!'

डेन पेचात पडली. स्त्रीस्वभावानुसार डोळ्याचा नि हाताचा तिच्याकडे पहात तिनं असा काही चाळा केला की, ती मुलगी जास्तच निराश झाली.

डेननं माझ्याकडे बघितलं. ती सर्व स्थिति लक्षात घेऊन अन् आतां त्या वातावरणाशी आपला कसला संबंध आहे असा विचार करून डेनला तिच्याशीं ओळख करून देण्याबद्दल मी खुणविलं.

'हे मि. जयंत हाटे येथील सुप्रसिद्ध 'ज्वाला' साप्ताहिकाचे संपादक.'

ती मुलगी गांगरली. साधारण भेदरली आणि आपल्या शेपट्याची व्यर्थ चाळवाचाळव करीत ती अस्खलित मराठीतून उद्गारली,

'अय्या ! तुम्ही महाराष्ट्रीयन तर ! काय बाई तरी नवल !'

तिचे ते महाराष्ट्रीयन हावभाव नि मराठीतलं तिचं तें समाधानातीत वाक्य ऐकून मीहि सभ्रमात पडलो.

'अन् जिम् ह्या की नाही बॅरिस्टर धनंजय याची कन्या मिस असावरी.' आम्ही हस्तादोलन केलं. तिचा तो गौर ताबूस गुबगुबीत हात दाबीत मी तिथं किती वेळ असतो कुणास ठाऊक पण जेव्हा डेन मोटारमध्ये जाऊन बसली तेव्हा मी तिच्यावर हंसरी नजर टाकून नि तिच्या हाताला नाजूक हिसका देत म्हटलं,

'अच्छा. भेटूं ना आपण पुन्हा कधीतरी !' आणि मी मोटारीत बसताना ती म्हणाली,

'बरं या; नमस्ते !'

रात्रीच्या त्या काळोखात मोटार वेगान चालूं लागली. ते आर्केस्ट्राचे स्वर पडदा वापरणाऱ्या मुलीप्रमाणे असदृश स्वरूपांत माझ्या कानात घुमूं लागले. माझं खट्याळ मन तितक्याच वेगानं असावरीभोवती भिरकूं लागले. ते वाईट दृष्टीनं मात्र नव्हे तर कधीहि न कल्पिलेल्या नि विश्वप्रेरित घटनेमुळे.

मी डेनकडे बघितल. ती भारीच आळशी बनली होती. पण जितकी तिला जास्तच नशा चढू लागत होती तितकीच ती जास्त सुंदर दिसूं लागली होती.

दादरच्या पारशी कॉलनींत मोटार थांबली.

आपल्या इमारतीच्या लिफ्टमध्ये शिरताना ती म्हणाली, 'Good night Gim.'

मी साधारण सुस्तीतच बसल्या जागेवरून म्हणालों, "Good-morning rather ! and a fresh one too."

निरंतर काळ न संपणारी समाधि तुटली. मी माझ्या इमारतीच्या पायऱ्या चढूं लागलों. पण एक एक पायरी खाली धसरूं लागल्याचा मला

भास झाला. मीं खोलींत दिवा लावला पण काय कुणास ठाऊक माझ्या मनात काही तरी हरवल्याचा नि निराशेचा अंधःकार मला जाचूं लागला.

× × ×

# २

विजेच्या त्या धगधगणाऱ्या फुग्याकडे मला बघावंसं वाटेना. जाग्र-णानं डोळे तारवटलेले होते. मी मेणबत्तीचा स्निग्ध प्रकाश केला.

ती लुकलुकणारी मेणबत्तीची ज्योत मंद-मंदपणें हंसत होती. अंधा-राचा प्रतिकार करिता येत असतानाही त्या अंधारापुढें ती शरण जात होती. तिच्या त्या तेजांत शतकानुशतकें गाजलेल्या दलिताची मनोव्यथित जळकीं अंतःकरणं मला दिसत होती. आणि तिच्या लुकलुकणाऱ्या हास्यात हजारों नि लाखों श्रमजीवी वर्गाचे विरोधी सत्तेविरुद्ध विकट हास्य मला दिसत होतें.

सकाळी आठ साडे आठच्या सुमारास संजयच्या येण्यानं मी जागा झालो.

'अरे, या दोनतीन दिवसात तुझा पत्ता कुठं आहे संजय. ह्या सहा महिन्यांत तूं मुंबईची पुष्कळच माहिती मिळविलेली दिसते. पण भटकून भटकून सर्व भाग तर तूं पाहून घेतले आहेस ना ?'

'जयंत, मुंबईची माहिती नसती तरी मला तूं सांगितलं असतंस तितकं कार्य मीं केलं असतं. नागपुराहून जो मी बुट्टी देवून आलों तो तें कांहीं इथं भरीव कार्य करण्यासाठीच नाही का ? अगोदरचे तीन महिने तर वणवण भटकण्यातच गेले अन् आता कुठं माझं बस्तान बसत चाललं आहे तुम्हा लोकात.'

'म्हणजे आपली ओळख होण्यापूर्वी तीन महिने मुंबईत होतास तूं संजय ?'

'तुला माहीत असेलच जयंत. नागपुर विश्वविद्यालयाची B. Sc. ची पदवी घेवून मी बाहेर पडलों. तिथल्या विद्यार्थीसंघाचा मी चिटणीस असल्यामुळें मला कॉलेज सोडूनही त्याच्या चळवळीत भाग घ्यावा लागला. पुढें अति जहाल गटात माझा व्याप वाढतच गेला आणि मीही भरीव भरीव किती तरी कार्यक्रम निर्माण करीत होतो. पण जयंत, खरं सांगूं, तेथील पुढाऱ्यात वैगुण्य असेल तर तें एकजुटीचं. किसान पक्षाला वाटतें जी काय असेल तर ती आमचीच चळवळ तर मजूर-पुढाऱ्यांनां वाटतं

आमचीच खरी सरशी. आणि त्यात अहिंसा गांधींची नि धर्म सावरकरांचा! मध्य प्रातात ही अशी चाळणी सारखी स्थिति झाली आहे. मजूर जमा होतात पण त्याना काही सागेन म्हटलं तर त्यात त्या उद्दाम पाढरपेशाचा माजोरेपणा. म्हणूनच तर मी आपला मुंबईचा मार्ग स्वीकारला अन् तो तिथं कुणालाही न कळवता!'

'अरे हो. संजय, परवा रात्री दादरच्या व्यायामशाळेत ती सभा भरली होती ना युद्ध-विरोधी कॉंग्रेस सप्ताहाची त्यात दुसरे काही भाग आमच्याकडे असल्यामुळे आम्ही काही तेथं जाऊं शकलो नाही. अर्थात् मग तिथं काही नवीन कार्यकर्ते पाठविले. त्यापैकी डॉ. पाटील तिथं अध्यक्ष म्हणून नेमण्यात आले आणि इतर दोन कार्यकर्त्यांची वक्ते म्हणून योजना करण्यात आली. पण त्या सभेचा फियास्को उडाला असं काल कॉ. वर्दे यानीं सागितलं. पहिला वक्ता बरं बोलला पण दुसऱ्या वक्त्याने कमालच केली. सभा भरली होती. त्यात जमाव होता सर्व तरुणाचाच. कुठंही अशा सर्वसाधारण सभेत जमाव असतो सर्व तरुणाचाच. पहिल्या वक्त्याचं अर्ध भाषण सर्वांनी ऐकून घेतलं. पण त्याच्या भाषणात सराईत वक्त्याचा प्रभाव श्रोत्याना वाटला नाहीं आणि त्यानी चलबिचल करावयास सुरवात केली. नंतर अध्यक्षानी कॉ. चौगुले या तरुण वक्त्यास बोलण्याकरिता उभे केलें. पण हा ताज्या रक्तानं सळसळणारा तरुण सुरू झालेल्या साम्राज्यशाही युद्धाचा विषय बाजूस ठेवून त्या तरुणानाच ज्ञानामृत पाजूं लागला— 'तरुण हो, तिकडे भडका उडाला आहे. आमच्या मायभूकरिता आमचीं अंतःकरणे जळत आहेत......' जमावातून कोणीतरी ओरडलं, 'अहो, फायर ब्रिगेड बोलवा. आग शात करा...वगैरे.' कॉ. पाटलांनीं सभा ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला आणि वेळेवर कॉ. वर्देनीही हजर राहून बरंचसं सावरून धरलं. सभेमध्ये एकदा का असा विचका झाला की तो सावरणं कठीणच. वर्देनी मला हे सर्व सागितलं तेव्हां तर मला हंसूंच आलं खूप. हे असे प्रसंग कुठं कुठं निर्माण होतात. मला वाटतं त्यांत पांढरपेशांची चूक नसून त्याचे कारण आपल्या नवोदित कार्यकर्त्यांची वेळप्रसंग पाहून धोरण आखण्याची न आलेली दृष्टि हेंच होय.'

'पण मी असं म्हणतो जयंत, समाजसत्तावादाचा एक शब्द नि एक

वाक्यही न वाचता त्यावर वाटेल तशीं विधानं नि ताशेरा झोडण्याचा या लोकाना काय अधिकार आहे ?'

'संजय, हे लोक मतामतांच्या गलबल्यात इतके भाबावून गेले आहेत की, त्याना आपलें ठराविक जीवन, संस्कृतीचं दडपण नि जुन्याची पकड यामुळें दुसरीकडे बघायला वेळच मिळत नाही! मजूर, विद्यार्थी नि किसान ह्याना वेळोवेळीं जागतिक परिस्थितीची धग लागलेली असते अन् त्याना ती जाणीव देताच ते एका उंच निशाणाखालीं वाटेल तें दिव्य करण्यास तयार होतात. पण ह्या पाढरपेशात ती दिव्य दृष्टि आणण्याकरिता तुझ्यासारखे असंख्य बुद्धिवादी तरुण त्याच्यात निर्माण झाले पाहिजेत.'

माझ्या आवडत्या सिगरेटचे गोड झुरके ओढीत मी त्याला प्रश्न केला, 'पण ते पहिले तीन महिने कसे घालविलेस रे संजय तूं ?'

'मुबईत आल्यानंतर मी G. K. U. (गिरणीकामगार युनियन) चा पत्ता काढला. कॉ. मालाणकर याना भेटलो. माझी कार्य करण्याची इच्छा मी त्याना बोलून दाखविली. तसं त्यानी माझं उत्साहानं स्वागत केलं. पण तुम्हा लोकाची आपल्या गटात आलेल्या नवीन माणसाना पारखण्याची वृत्ति किती छान आहे! ते तीन महिने कधी अर्धपोटी तर कधी उपाशी रात्री युनियनच्या ऑफिसात झोपून काढले. मी कामगाराचे नि कार्यकर्त्यांचे संबंध सारखे वाढवीतच गेलो तेव्हा कुठं त्यानी त्या कामगार-मैदानावर मागच्या जूनमध्ये मुंबईत भरलेल्या आ. इं. कॉ. क. च्या अहवालाची माहिती कामगाराना समजून सागण्याची जी मोठी सभा झालीना, त्या ठिकाणी तुझी नि माझी ओळख करून दिली. मुबईतल्या जीवनाची ही अशी आहे मजा माझी. मला येथे एक गोष्ट प्रामुख्यान दिसते की, इथं असे किती तरी कार्यकर्ते आहेत की जे मानसिक नि शारीरिक झीज सोसूनही कोणत्या तरी वेगवान् शक्तीनं काम करीत आहेत.'

'संजय, आम्हाला अशाच कार्यकर्त्यांची गरज आहे. आपल्या ह्या समाज-सत्तावादी राजकारणात व्यक्ति, श्रीमंती, फाजील घमेंड नि प्रसिद्धीची लुडबुड या सर्व गोष्टींना गौण स्थान आहे. आपल्यासारखी विचारप्रणालि असलेल्या प्रत्येक व्यक्तीनं आपल्या संबंधात आलेल्या कोणत्याही व्यक्तीस एक एक कार्यकर्ता बनवीत गेलें तर आपल्याला पाहिजे आहेत ते दिवस

काहीं लांब नाहींत.'

मी टेबलाशी बसलो. माझी नजर आरशाकडे गेली. माझा चेहरा अतिशय मलूल दिसत होता. डोळे लाल पडले होते. टेबलावरच्या कॅलें-डरची १९३९ च्या एक आक्टोबरची तारीख पुढे ठेवीत मी संजयला म्हटलें, 'तुझ्याकडे एक महत्त्वाचं काम आहे संजय. अरे पण तूं एकटाच आलास. मी तर आज चौघाना नऊ वाजता बोलावलं होतं ना ?'

'आपले रेल्वेमॅन्स युनियनचे कॉ. जयवंत आहेत ना, त्यांच्याबरोबर मी गेलों होतो कल्याणला परवा अन् तेथून आज जो निघालो तो सरळ आलों तुझ्याचकडे आता.'

'अस्सं का ?' मी खरखरीत टॉवेलानं तोंड पुशीत म्हटलं.

पोऱ्यानं आणलेला चहाचा कप संजयच्यापुढे ठेवला आणि एक कप मी पुढ्यात घेऊन वर्तमानपत्र वाचूं लागलो. म्युनिक येथें रशियाला बाजूला सारणारा चेबर्लेन, हिटलर युद्धाच्या गोष्टी बोलूं लागताच रशि-याच्या दोस्तीचं संधान बांधूं लागला होता पण रशियानं हे साम्राज्यशाहीचे सर्व डाव ओळखून राजकारणाचे फासे टाकण्यास सुरवात केली होती.

'काय रे जयंत, तुझे डोळे असे तारवटलेले दिसतात अन् हा सिल्कचा सूटही असाच टागलेला दिसत आहे. तूंही कुठं बाहेरगांवी गेला होतास कीं काय ? आपण कॉंग्रेस ह्याच संस्थेत काम करायचे नि खादीचे कपडे वापरायचे असं ठरविलं होतं ना ? मग तूं त्याला अपवाद कसा ? बघ बरं शिकवणीचे पैसे मिळताच मीहि खादीचेच तीन चार सूट्स् शिवून घेतले आहेत.'

मी उरलेला चहा घशात ओतीत नि त्याची निरर्थक बडबड थांब-वीत म्हटलं, 'काय करतोस ते खादीचे कपडे घालून राजकारण खेळण्यांत संजय ? आपल्या मनात नि नसनसात पूर्ण राष्ट्रीय भावना खेळत असली पाहिजे. मग ह्या वस्त्रपेहरावाची त्यापुढें मिजास कशाला ? आतां तर आमच्यापुढे अशी वेळ आली आहे की, या वेळेस आम्ही अशा कोणत्याच थोताडाकडे लक्ष न देता बुद्धि, मन नि शरीर याचं बलिदान करण्यास सज्ज असलं पाहिजे.'

'काय म्हणालास जयंत, बलिदान !'

'हो, तेंच. हे बघ वर्तमानपत्रातले कॉलम्स नि कॉलम्स, शब्द नि शब्द आम्हा तरुणाना सांगत आहेत की, जोंपर्यंत प्रचंड लढा उभारला जाणार नाहीं नि रक्त साडणार नाहीं तोंपर्यंत स्वातंत्र्य मिळणार नाहीं. काळाच्या इतिहासांत स्वातंत्र्याची संधि फारच कमी येत असते अन् एकदा का ती घालविली कीं मग पंचवीस पन्नास वर्षे पारतंत्र्यात खिचपत पडावं लागतं.'

'तुझं काहीं बाबतीपर्यंत पटतं मला जयंत. पण तुझी ही उतावळे-पणाची भाषा मला जरा असंमत वाटते.'

'मला तुझ्या बोलण्याचा आशय समजला आहे संजय. तूं म्हणशील आमच्या हातात काय आहे ? ज्या यंत्रसामुग्रीच्या जोरावर पाश्चात्य लोक लढत आहेत त्याचं दर्शनसुद्धा आम्हाला सत्य स्वरूपात होणं कठीण. मग ती आम्हाला मिळणार कशी नि आम्ही मार्ग काढणार कसा ? आस्ट्रियन नागरिकावर राजाचा जुलूम नि जाच होऊं लागला तेव्हां तेथील पुढाऱ्यांनी उद्गार काढले होते, 'राजा आणि सेनापति शरिरावर सत्ता चालवितील, पण मन ?—तें पूर्ण स्वतंत्र राहील. अन् जोंपर्यंत ते स्वतंत्र राहील तोंपर्यंत स्वातंत्र्याची धडपड करायला काहीच अडचणी पडणार नाहीत.' म्हणूनच मी म्हणतो की, आपला लढा नि आपल्या चळवळी ह्यांचा लोकाच्या मनावर जितका जास्त जास्त परिणाम होईल तितका तितका आपला मार्ग सुलभ होत राहील.'

'मिस् पी. बी. बरोचा नाहीं आल्या संजय?' अजयनें येतांच संजयला प्रश्न केला.

मी त्या तिघाकडे गंभीर नजरेनं बघत म्हणालों, 'बहुतेक ती येणार नाहीं आज. पण काय रे, विनय नाहीं आला तो ?'

कुणाला काहीं सागताना डाव्या हाताच्या मनगटाभोंवती उजव्या हाताचीं बोटं गरगर फिरविण्याची मला संवय होती. आताही त्याचप्रमाणें करीत मी त्याना म्हणालों,

'तुम्हाला मीं बोलाविलं होतं तें याकरितां कीं, आतां युद्धाच्या सुरवातीमुळे आपल्यापुढें किती तरी कार्यक्रम उभे राहिले आहेत. पहिला कार्यक्रम कॉंग्रेसच्या झेंड्याखाली आपण पार पाडीत आहोंत. तो म्हणजे 'युद्धविरोधी सप्ताह.' पण हा प्रचार चालू असतांनां आपणाला विद्यार्थ्यां-

मध्येंही चांगलाच जोर मारायला हवा. त्याप्रमाणें उद्या सर्व शाळा नि कॉलेजांतून हरताळ पाळण्याची आम्हांला सूचना करण्यांत आली आहे आणि त्याची सर्व जबाबदारी तुमच्च्यावरच अवलंबून आहे. आपली विद्यार्थीसंघटणा अगदी मजबूत आहे अन् तुम्ही नियोजिलेले एक एक कार्य उत्तम प्रकारें पार पाडाल अशी मला आशा आहे. तर आजच जाऊन सर्व कार्यकर्त्यांना नि शाळाकॉलेजातल्या विद्यार्थीसंघाच्या सेक्रेटरींना भेटा अन् उद्याच्या संपाच्या तयारीचें आजच बी पेरून ठेवा.'

'उद्या वेळेवर प्रिन्सिपॉल नि हेडमास्तरांना अगोदर नीटपणें समजून सांगा. नाही तर मग आपलं उद्दामपणाचं शस्त्र बाहेर काढा. साऱ्या विद्यार्थ्यांना आपआपल्या वर्गातून बाहेर काढा. मग त्या सर्वांना जमवून रस्त्यावरून एक प्रचंड मिरवणूक काढा. आपल्या स्वातंत्र्याच्या मागण्याचा आवाज उंच करा. प्रत्येक विभागातली मिरवणूक त्या विभागातल्या मैदानावर नेऊन शांत करा. विद्यार्थ्यांना हे युद्ध कुणाकरिता, का व कशाकरिता लढलं जात आहे ते अशा रितीनें समजावून सांगा की, त्यामुळे आताच आपण कोणच्याही राजकीय पेचात येणार नाही. भिंतीवर पोस्टर्स डकविण्याची सर्व व्यवस्था जीवनकुमारनी केलीच असेल कदाचित्. अन् मी ही सर्व बातमी वर्तमानपत्रातून देण्याची व्यवस्था करीनच. येवढंच सांगण्याकरिता तुम्हाला बोलाविलं होत मी आज.'

संजीवच्या त्या हंसऱ्या चेहऱ्याकडे वळून मी म्हणालो, 'हं कस काय चाललं आहे तुझं तें मासिक संजीव? लखनौकडील काही विद्यार्थीकार्यकर्त्यांचीं मला पत्रें आली आहेत.' मी ड्रॉवरमधून ती पत्रे काढून देत म्हटलं, 'ह्याच्याशी तूं पत्रव्यवहारानं संबंध वाढव अन् हे बघ पेरीनला बरोबर घेऊन जा आज. ती तुझ्याबरोबर असली म्हणजे विद्यार्थिनीत विशेष जोर येईल.'

मला माहीत होतं, संजीव विद्यार्थ्यांचा अतिशय प्रिय कार्यकर्ता आहे. त्याचे ते चष्म्याच्या आतून नेहमी हंसणारे डोळे, चेहऱ्यावर सतत दिसणारं मोकळं हास्य, त्याचे ते उलटे फिरविलेले थिटे केस आणि बोलताना शब्दामागून शब्द नि वाक्यामागून वाक्य अगदी जलद जलद वापरण्याची नि लांब लांब अंतराच्या स्टेशनवर थांबणाऱ्या गाडीसारखी

त्याची ती भाषणपद्धति हे सर्व भाव दुसऱ्यावर त्याची छाप पाडण्यास पुरेसे होते. समाजशास्त्रावरील पुस्तके वाचण्याचा त्याला भारी नाद! तो एल्‌एल्. बी. चा विद्यार्थी असूनही कायदा शिकण्यापेक्षां विद्यार्थ्यांच्या संघटनेचा मार्गच त्याला त्याच्या अभ्यासापेक्षा जवळचा होता.

आणि अजय तो तर काही विचारूंच नका. त्याची उंची भलतीच. आपल्या उंचींनं व शरिराच्या न कळत भरीवपणानं नि त्याच्या काळ्याभोर चष्म्याच्या चौकटींतून त्याची ती कणखर नजर कुणालाही आपल्या शक्ति-सर्वस्वानं आपल्याकडे ओढून आणीत असे. कोणीही परिचित त्याच्या त्या नजरेला भीत असे पहिल्यादा बोलताना. पण एकदा का तो बोलूं लागला की, सर्वांच्या शंकाकुशंकांचं समर्थन करून नि विरोधकाची तोंडं चूप बसवून आपल्या कपाळावरील घर्मबिंदु पुसण्यात तो मग्न होऊन जात असे नंतरच्या वेळात. तो अजागळपणे उंची उंची कपडे घालीत असे. तो मागच्याच वर्षी पदवीधर झाला होता अन् ह्या वर्षी विद्यर्थीसंघाच्या अध्यक्षपदाची जागा त्यानं पटकाविली होती.

पण मला संजीवची नि अजयची कधीच बरोबरी करता आली नाही. दोघाच्या कार्य करण्याच्या पद्धति निरनिराळया. संजीवच्या प्रत्येक कामात उतावीळपणा नि धादल तर अजयची प्रत्येक कामातील वागणूक उंदरावर माजराच्या होणाऱ्या वागणुकीसारखी.

हो. अन् तो बुटकासा गोल चेहऱ्याचा केस उलटे न फिरविताच भाग पाडणारा साधारण लठ्ठ अन् प्रत्येक बैठकीत शेवटच्या रांगेत बसून नि तेथूनच आपल्या योजना शातपणे सागणारा विनय! एम्. ए. झाल्यावर तो वकील बनला. त्याच्या कार्यात फारच शातता पण त्याची ती शातता मला सागरासारखी भासत असे आणि त्याचं वक्तव्य मला मुद्देसूद लिहिलेल्या ग्रंथासारखं वाटत असे. त्याची नजर नेहमी शात दिसे. त्याच्या त्या शातपणे सागण्याचा नि बोलण्याचा परिणाम विद्यार्थ्यापेक्षा विद्यार्थिनी-वरच जास्त होत असे आणि तशात त्याच्या बरोबर डेन असली तर मग काय विचारता! या चौघाजणाची गट्टी म्हणजे साऱ्या विद्यार्थी नि विद्यार्थिनीत, त्याच्या गटा-गटात स्वातंत्र्याची आग भडकविण्याकरितां उड-णाऱ्या ठिणग्याच!

संजीव नि अजय निघून गेले. मी संजयला थांबवीत म्हणालों, "संजय आपलीं ठिकठिकाणचीं अभ्यासमंडळं ठीक चाललीं आहेत ना? हें बघ प्रत्येक अभ्यासमंडळावर तूं देखरेख ठेव आणि अभ्यासमंडळं घेणाऱ्या कार्यकर्त्यांच्या अडचणी सोडवीत जा. माझ्याकडे स्वतंत्र दोन तीन अभ्यासमंडळाचें नेतृत्व असल्यामुळें मला सर्व ठिकाणी जाता येत नाहीं. अन् हें बघ, जाता जाता रूपमती दातारला G.K.U. मध्यें फोन करून साग की 'मला जरा बरं वाटत नाही म्हणून वेळेवर कदाचित् येऊं शकणार नाही मी. संपादकीय ऑफीसमध्यें जीवनकुमार असेलच–त्याला बरोबर घेऊन जा म्हणावं."

मी आरामखुर्चीत अंग टाकलं. संजय माझा बालमित्र होता. पण त्याला मी प्रत्यक्ष पाहिलं तेव्हा ती मैत्री अगदीं पुसट होती. त्याचं नावच काय तें माझ्या लक्षात होतं. त्याचा तो सकस बाधा, गौरवर्ण, गौरसा चेहरा, हंसताना नि बोलताना त्याच्या चेहऱ्यावर होणारे मनोहर मिश्र भाव पांहून माझं एके काळीं हरवलेलं मित्रप्रेम जागं झालं आणि माझी नि त्याची किती गट्टी जमली या सहा महिन्यात.

मी स्वतःशीच विचार केला. माझ्या स्वतंत्र आयुष्याला सुरवात झाल्यापासून कितीतरी लोकाशी माझा संबंध आला नि मैत्री झाली पण त्याचं पर्यवसान राजकारणाच्या सागरावर साऱ्यानी मिळून स्वातंत्र्याचा किनारा गाठण्याकरिता वल्हाविल्या जात असणाऱ्या होडीसारखंच नाही का?

मला वाटतं, निसर्ग झाडाना जन्म देतो तो त्याची पाळंमुळं खोल जमिनीत रुजण्याकरितां अन् तें झाड आशेनं आकाशाकडे बघतं तें जीवन नि प्रकाश घेऊन फलभरित होण्याकरिता आणि त्याच दृष्टीनं माणसाला परिस्थिति जन्म देते ती समाजात त्याच्या कार्याची व्याप्ति नि उत्क्रातीचीं तत्त्वं प्रतिबिंबित होण्याकरितां अन् ती व्यक्ति आशेनं आपल्या सहकाऱ्याकडे बघते ती ते इच्छित कार्य साधण्याकरितां!

× × ×

तीन वाजतां मी उठलों असेंन. मी खादीची स्वच्छ विजार अटकविली–तसाच खादीचा नेहरू शर्ट घातला. मी आरशांत पाहिलं. शर्टचा मानेवरचा पट्टा मी तसाच ठेवला. माझी कातड्याची बॅग मी हातात घेतली

तीच आतां माझ्या आयुष्याची सोबतीण होती. जहाल पत्रकापासून तों प्रेमाच्या गुजगोष्टी करणारी सारी कागदपत्रं तींत एकमेकांशीं खेळत होतीं.

मी ' ज्वाला ' ऑफिसमध्यें आलों. तेथें कोणीच नव्हतें. वर्तमानपत्राचं टपाल आज तसंच रेंगाळत पडलं होतं. कांही पत्रें नि पाकिटें माझ्या हस्तस्पर्शाची वाट बघत होती अन् खुर्चीसमोर टेबलावर कंपाझिटरनं प्रुफं-( तपासण्याची कागदें ) ही ठेवून दिली होतीं.

आज जीवनकुमार मित्रा नि मणिबेन कारा दोघेंही ऑफिसमध्यें आलेलीं दिसत नव्हतीं अन् तीं येणार नाहींत अशीं चिन्हें दिसत होतीं.

मी समोर दिसणारी एक एक कामें सिगारेटच्या धुरांत नि चहाच्या कपात उरकण्याचा सपाटा लावला होता.

' हॅलो ! हाटे, तुम्ही आतांच आला वाटतं. ' जीवनकुमारनीं येताच मला प्रश्न केला.

मीं हंसत नि त्याच्यावर दृष्टि रोखीत म्हटलं, ' होय आतांच आलोंय. पण हें तुम्ही कसं ओळखलंत ? '

' मी मघाशी येऊन गेलों होतो पण तितक्यात मला रूपमतीचा फोन आला. मला तिकडे जावं लागलं. '

' बरं तर मग मी आतां ' स्टूडंट्स ब्रदरहुड ' मध्यें जातों. उद्याच्या कार्यक्रमाबद्दल आज तेथे सर्वसाधारण सभा बोलाविली आहे. मणिबेन आली तर तिला पाठवून द्या हं तिथं. '

मी खुर्चीवरून जरा पुढें सरकून नि सिगरेटचा झुरका ओढल्यानंतर राख रक्षापात्रात टाकीत म्हटलं, ' पण हें बघा जीवनकुमार, सर्व शिस्तींत होऊं द्या. नाहीं तर जाल गरम रक्त दाखवायला नि होईल भलतंच. '

' नाही हो हाटे. तुम्ही दिलेल्या सर्व सूचना आम्ही अंमलात आणूं ' असं म्हणत तो निघाला. मी त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे दृष्टि वळविली. तो थोडासा दूर जाताच मणिबेन कारा त्याला भेटली असावी. तिचा मोठ्यानं हंसण्याचा आवाज माझ्या चागला परिचयाचा होता.

जीवनकुमारचा तो निमगोरा वर्ण नि काटकुळी शरिरयष्टि, साधारण लांबट चेहरा अन् त्यावर दिसणारी रागीट झाक अन् तीव्र नजर ! तो नेहमी नेहरू शर्ट नि पायघोळ पायजामा वापरीत असे. यावरून त्याची

त्यागवृत्ति नि देशसेवेची कल्पना कुणालाही त्याला पहिल्या क्षणात पहातांच पटत असे. त्याला प्रतिपक्षाशीं मुद्देसूद कधींच बोलतां येत नसे अन् लोकाना ते कसं समजत नाही म्हणून तो जास्त जास्त आपल्या चेहऱ्यावर रौद्र हावभाव आणीत असे. त्याची कळकळ त्याच्या या स्वभावावरून जरी स्पष्ट दिसत असली तरी पण तो लिहूं लागला की त्याचीं तीं जहाल मते नि गोड भाषा याची मोहनी वाचकावर पडल्याशिवाय रहात नसे. तो बनारस विश्वविद्यालयाचा पदवीधर होता. त्याने तेथल्या क्रान्तिकारक चळवळींत भाग घेतला होता व १९३० मध्ये तुरुंगवास भोगला होता.

तो कॉलेजमध्यें असतानाच मणिबेनची नि त्याची प्रीति जडली. साधारण उंचीची, सावळ्या रंगाची, तरतरीत नाकाची, पाणीदार डोळ्याची, बोलण्यात तल्लख नि कार्यात चपलता ! पण मला तिची ती कलात्मक बोटे फारच आवडत असत. ती व्यंग्यचित्रे काढण्यात फार पटाईत होती.

दोघाचाही आर्थिक व बौद्धिक दृष्टया आमच्या चळवळीला फारच फायदा होत होता. जीवनकुमाराचे, टोपण नावाखालीं लिहिलेले एक एक लेख म्हणजे तडा गेलेल्या लाल भडक कोळशाच्या उडालेल्या ठिणग्याच ! अन् मणिबेनची ती व्यंग्यचित्रे म्हणजे सहज बघता बघता वाचकास राज-कारणाची सध्याची स्थिति, ओल्याचिंब पेहरावात दिसणाऱ्या तरुणीसारखी सहज समजून येण्यासारखी होती. तिच्या त्या चित्राचा, साम्राज्यशाहीच्या छताखालीं चालणारी नियतकालिकेही आदरानं स्वागत करून आमचा प्रचार सुलभ करून देत होती.

मणिबेनची नि जीवनकुमारची ती जडलेली प्रीति, त्या प्रीतीची ती अंत न लागणारी दोरी आणि लग्नानं त्याचा शेवट होऊं नये म्हणूनच कीं काय ती त्याच्या अविनाशी मित्रत्वात गुंफली जात होती.

---

# ३

माझे हात दाढी करण्यांत गुंतले होते आणि तोंड कांहीं तरी गुण-गुणण्यात गढून गेलें होतें.

पाढऱ्या पाढऱ्या पोषाखात नि हंसऱ्या हंसऱ्या गुलाबी चेहऱ्यांत डेन आली.

तिनं आपल्या नेहमीच्या सरावाप्रमाणें माझ्या गाण्याची री ओढीत खोलीत खूप खूप चकरा मारल्या. नंतर तिनं टेबलावरली पुस्तकें नीट करून ठेवली. वर्तमानपत्राची नि साप्ताहिकाची फाईलीत रवानगी केली. कांहीं नव्या इंग्रजी मासिकाचा गठ्ठा तिनं आपल्याबरोबर घेतला आणि टेबला-वरची नि ड्रेसिंग टेबलची साफसुफाई ती करूं लागली.

माझ्या खोलीत एका कोपऱ्यात विळा नि कोयत्याचं एक अगदीं लहानसं चित्र फ्रेममध्ये होत आणि त्यावर एक लहान लेनिनचा फोटो लटकविला होता. त्या कोपऱ्याला मी 'रेड कॉर्नर' नाव दिलं होतं.

तो रेडकॉर्नर तिनं आदरपूर्वक साफ केला आणि बाजूच्या टांगलेल्या नकाशावरची धूळ झाडीत ती म्हणाली, 'जिम तुझ्या ह्या जागतिक नकाशावरची धूळ साफ होवून तो चोपडा नि चकचकीत होईलही. पण प्रत्यक्ष साऱ्या जगावर पसरणाऱ्या महायुद्धाचा धूर साफ करणं कुणाच्या रे हातात आहे ? एकच नरराक्षस तो हिटलर—त्यानें आपल्या स्वस्तिक निशाणाखाली राष्ट्राराष्ट्राचे खून पिण्याच्या आसुरी आकांक्षेनं सर्व ठिकाणीं लाल रंगाच्या नद्या वाहावयाला सुरवात केली आहे. त्याच्या ह्या नरभक्षक नि संहारी वृत्तीपुढें आताचा हा नकाशांतला लाल भडक रंग बघ कसा पाढरा पडत चालला आहे.'

नाहीं तरी डेनचा स्वभाव होताच तसा. तिला मधून मधून राजकार-णात कांहीतरी बोलण्याची नि मला त्यावर माझं वक्तव्य एकाग्रतेनं ऐकत बसण्याची सवयच जडली होती. मी तिला आज जिरवायचं ठरविलं होतं.

'छे: ! डेन, तूं म्हणतेस ते जग नि त्याला जिकण्याकरितां रक्त ! ह्यांतलं आपल्याला कांहींच कळत नाहीं बुवा. पण दाढी करण्याकरितां येणारं रक्त मला कळतं आणि त्यावरून सबंध मानवता एक आहे अशी

जाणीव होते तरी पण ती गुळगुळीत झाली म्हणजे!'

'हं ? आलास तूं आपला मूळ पदावर बरं का जिम. परवां तूं नाचतांना किती वात्यपणा केलास ? अगोदर मला म्हणालास कीं मला नाचतांच येणार नाही. पण वेळेवर खेळून अगदीं थकविलंस मला जिम तूं बघ. माझे पाय दुखत आहेत अजून अन् त्या मुलीनं पाजलेल्या मद्यानं माझं शरीर कसं आळशी बनून गेलं आहे अगदी ! काल मी कॉलेजांत गेलेंच नाहीं. पण आज न जाऊन भागणार कसें ? नाहीं तर मग या समोरच्या डोळ्यात निराळेच रंग दिसूं लागतील ना !'

'पुरे कर हं डेन. ते रंग दिसायला मी काहीं हुकूमशाह नाही. स्त्रीजात एकूण नाजूकच ! उगिचच जातात विक्रम गाजवायला नि सबबी दाखवितात पुरुषाच्या धाकाच्या.'

नंतर ती हंसत म्हणाली, 'हो. हो. कळलं की, नाचवितातच की नाहीं त्या पुरुषाला सहज बोलता बोलता.'

आणि नंतर ती जास्तच मिश्कील बनून माझ्यावर एक तिरपी नजर टाकीत म्हणाली, 'जिम, मी की नाही तुझ्यावर अगदी खूप रागावलें आहे. कारण तुझ्याकडून काहींही न कळलेल्या कितीतरी गोष्टी पपानी सांगितल्या मला.'

मी विचारी मुद्रेनं आरशात बघितलं आणि नंतर तिच्यावर दृष्टि रोखीतच विचारलं, 'डेन, पपाना सांगितलीस त्या रात्रीची हकीगत तूं ?'

ती आपले नाजुक अधर एकमेकावर घट्ट करीत म्हणाली, 'हो. सहज बोलतां बोलता सांगितली सर्व मीं ती.'

'मग पपा काय म्हणाले ? माझ्याबरोबर तूं नाचलीस हेंही पपाना सांगितलंस तूं डेन ?'

ती माझ्या खांद्यावर दोन्ही हात ठेवीत मला गदगदा हालवीत म्हणाली, 'अरे बाबा हो. हो. सर्व कांहीं विचारलं नि सर्व काही सांगितलं.'

मी थोडा पुस्तकाशीं चाळा करीत तिला म्हणालो, 'तूं फारच वाईट मुलगी आहेस.'

ती आपली पुस्तकं एकावर एक ठेवीत म्हणाली, 'तूंही असाच खोडकर मुलगा आहेस.'

'बस् आतां तुझ्याशीं एकदम प्रणयबंदी नि भाषणबंदी !'

'म्हणजे दारूबंदीपैकीच हा एक प्रकार आहे काय ?'

मी तिचा गौर दंड धरीत म्हटलं, 'हो. अगदीं तसलाच प्रकार आहे हा. स्त्री ही नशा आहे. पुरुष ती मिळविण्याचा प्रयत्न करतात आणि एकदा का ती नशा त्याना मिळाली कीं, ते आपलं कर्तव्य विसरतात !'

ती आपल्या नाजूक अधराशी चाळा करीत उत्तरली, 'बरं. बरं. पुरुष सुद्धां स्त्रियाचं एक खेळणं आहे. त्याचाच नाद नि त्याचाच ध्यास या पुढें आपल्या भोवतालचं तें विशाल वातावरण त्या विसरून जातात आणि जन्मभर हा चिमुकला खेळ खेळण्यात आयुष्याचा प्रभावी प्रवाह निकामी ठरवितात.'

मी तिच्या उत्तराकडे दुर्लक्ष करून खोलीत गेलो. कपडे बदलून बाहेर आलो. माझा चेहरा गंभीर बनला होता आणि केसाचा भाग पाडायचंही मला भान राहिलं नव्हतं.

आम्ही दोघेंही बसमध्ये बसलों. मी तिच्याशी काहींही न बोलता रस्त्याकडे माझी दृष्टि वळविली पण ती मात्र मधून आपल्या भरीव छाती-कडे तर मधून माझ्या बाजूला बघून मोहक अभिनय करून पहात असल्याची मला जाणीव होत होती.

कंडक्टर येताच मी तिकीटे घेण्याकरिता खिशात हात घातला. पहातों तो काय खिशात पैसे नव्हते अन् चामड्याची बॅग मी घेतली नव्हती. शत्रु-पक्षाचा वध करण्याकरिता हिरीरीनं गेलेला एखादा शिपाई शत्रु एकही जागेवर नसला म्हणजे जसा नाउमेद होऊन बसतो, तसा मी बसलो नि डेनवर नजर फेकीत म्हटलें, 'आता ?'

ती त्याचीच वाट पहात होती. कंडक्टरला पर्समधून पांच रुपयांची नोट देत नि त्याला बाकीचे पैसे माझ्याजवळ देण्याची खूण केल्यानतर ती म्हणाली, 'झाली का तुझी भाषणबंदीची मोहीम संपूर्ण. जेव्हा भाष-णाची अत्यंत आवश्यकता असते आणि त्यावर पुढे घडणाऱ्या घटना अवलंबून असतात, अशा वेळेस लोकाच्या जिज्ञासेला थोपवून धरून नि कांही तरी थोताड माजवून मौनतेचं वेड घेण्याची गाधीजीमारखी थोडी पुढारी वृत्ति तुझ्यांतही भरपूर जमा झालेली दिसते बरं कां जिम ?'

पण माझं मन कुठं तरी दूर दूर गिरक्या खात होतं. डेननं आताच सांगितलेल्या नाचाच्या प्रसंगानं माझं मनःस्वास्थ्य हिरावलं होतं. डेन अल्लड होती. तिच्यात स्त्रीसुलभ खेळकरपणाची नि आपल्या प्रियकराला रमवून योग्य त्या रम्य वातावरणात नेण्याची प्रेमप्रसाधनाची जादू भरपूर जमा होती.

मी जरा त्रासिकपणानेच तिला विचारलं, ' डेन, काल पैसे किती खर्च केलेस तूं ? '

पण मघाशी ती जें बोलत होती, त्यावर तिला पाहिजे ते न बोलल्या-मुळं तिनं जरा निराश होऊनच उत्तर दिलं. ती तुच्छतादर्शक शब्दात म्हणाली, ' झाले असतील तीस चाळीस. पण काय रे नसत्या पचाइती काय करायच्या आहेत तुला करून. अन् पुन्हा त्याच त्या विषयाला आण-तोस कशाला खेचून खेचून ? '

' तूंच करून ठेविल्या आहेस नसत्या पंचाइती-नि नसते उपद्व्याप. '

' म्हणजे, म्हणण तरी काय आहे तुझं जिम. '

' तुला माहीत असेलच डेन. दद्दा वारल्यानंतर मी तुझ्या पप्पांपुढे शपथ घेतली होती कीं, मी आतां नाचरंग सर्व सोडून देईन. एम्. ए., एल्‌एल्. बी. होऊन सॉलिसिटर होईन. दद्दाच्या पश्चात् त्याची फर्म चालवीन नि त्यानी तुमच्या जवळ माझ्याकरिता ठेवलेल्या ठेवीचं मी सार्थक करीन म्हणून. '

' मग तें सारं तूं तर करून दाखविलंस ना जयंत ! '

' डेन, पदवी घेऊन का कुठं त्याचं सार्थक होतं ? इतकं शिक्षण घेतलं मी किती झगडत झगडत आणि एक एक पदवी मिळविली मी मध्ये किती किती वर्षांचं अंतर पाडून ! माझ्या शिक्षणाकरिता दद्दानी किती पैसा खर्च केला आणि त्यात पुन्हा तुझ्या पपानी दद्दाचे ट्रस्टी म्हणून मला किती सहाय्य केलं. हे सर्व विचार माझ्या मनांत आले कीं डेन...'

' म्हणूनच का तूं आमच्या घरी यायचं वर्ज्य केलं आहेस जयंत ? '

' नाहीं. पेरीन तसं मुळीच नाही. पण उपकारकर्त्यांनीं उपकार करावे अन् ते घेणाऱ्याजवळ फेड असूं नये, यापेक्षा लाजिरवाणं जिणं तें कोणतें ? '

"पण पपा तुला कधीं तसं बोलले नाहीं जिम. नसत्या शंका काढून कां त्रागा करतोस उगाच ? कालच पपा मला म्हणाले होते कीं, 'डेन, हा जयंत सहा महिन्यापूर्वी आपल्या घरी आला होता. अन् तेव्हांपासून जो गेला तो परतला नाही अजून. कोणत्या कामात गढलेला आहे तो आहे का माहित तुला ? तो काही मनांतलं सांगणार नाहीं नि करायला चुकणार नाही, असा तो एक आयुष्याला उधळून लावणारा तरुण आहे. तुला तरी त्यानं सांगितलं आहे का डेन, आपण पुढें काय करणार आहों नि आयुष्य कसे घालविणार आहो ते.' "

मी गालातल्या गालात हंसत म्हणालो, 'खरंच असं म्हणाले ते ?'

ती माझ्याकडे हंसऱ्या नयनानं काहीसं मिश्कीलपणानं पहात म्हणाली, 'काय सांगूं का पपाना. महाराज, विद्यार्थ्यांचे म्होरके, मजुरांचे कार्यकर्ते नि साप्ताहिकाचे संपादक...!'

मी उफाळ्यानं हंसत नि डेनचा हात दाबीत म्हटलं, 'डेन, बरीच टिंगल साधते आमची तुला नाही!'

परळचा भाग येताच मेडिकल कॉलेजात जाण्याकरिता डेन माझा निरोप घेऊन उतरली.

तिनं किती किती गोड तरळणाऱ्या स्वप्नात नेलं होतं उंच उंच मला?

आज ती किती आकर्षक होती. पांढऱ्या खादीच्या पातळात नि तसल्याच ब्लाऊझमध्ये तिची ती उंच नि सकस तनू मला तपस्विनीसारखी दिसत होती.

ती खाली उतरली नि रस्त्यावरून एकदा माझ्याकडे नजर टाकीत निघून गेली. किती नादमधुर गतीनं देहाला हेलकावे देत चालली होती ती.

ती पाठमोरी होताच नि बस् चालूं लागताच मी ते रम्य स्वप्न विसरून गेलों.

माझा अनुभव सांगूं लागला, स्त्री पुरुषाची नेहमीच भरमसाट स्तुति करीत असते. कोणतीही स्त्री आपल्या पुरुषाला कडू नि टाकून बोलत नसते. कारण काय असेल बरं! शिरीनबाला असंच नव्हती का वागली माझ्याशीं अगदी शेवटच्या त्या घटकेपर्यंत ? पण नंतर...'

बस् मध्येंच थांबली. मी बाहेर पाहिलं. जवळच्या शाळांतील सर्व

मुलं रस्त्यावर येऊन गल्ला करूं लागलीं होतीं आणि त्यांचा तो सामुदायिक आवाज 'साम्राज्यशाही नष्ट होवो!' 'लोकशाहीचा विजय असो' 'महायुद्धाचा निषेध करा!' 'चेंबर्लेन गो बॅक' वगैरे असंबद्ध ललकाऱ्या माझ्या कानात घुमूं लागल्या.

मी सारं सारं विसरून गेलों. त्या समुदायांत एकरूप झालों. किती धन्यतेनं भरून आलं होतं माझं अंतःकरण आणि किती समाधान झळकलेलं दिसत होतं माझ्या चेहऱ्यावर!

× × ×

मी लिहीत असतानांच संजय आला. त्याच्या चर्येवर भलतंच विजयी हास्य दिसत होतं.

'आजचं डेमॉन्स्ट्रेशन् तर खूपच झालं जयंत!'

तोंडातून सिगरेटचा धूर सोडीत नि राख पुढच्या पात्रांत टाकीत मी त्याला म्हणालों, 'हो तर. ते सारं बघत बघतच मी आलों आहें येथें आता.'

'काय तो विद्यार्थ्यांचा अफाट उत्साह नि जमाव! मी तर अगदीं विस्मितच होऊन गेलों आहे बुवा!'

'चौपाटीवर केवढा अथांग समूह जमला होता सर्व विद्यार्थ्यांचा. तूं बोलणार आहेस असं त्याना कळताच त्यांच्या चेहऱ्यावर काय पण हास्य खुललेलं दिसत होतं. पण तूं आला नाहीस. सर्वांनी तुझ्या नांवानं तेथं गलका सुरू केला. जीवनकुमार, संजीव नि मिस् बरोचानी त्याना शांत केलं. सर्व विद्यार्थी आजचा दिवस साजरा करून तेथून परतलेही पण त्यांच्या मनात तुझं आजचं भाषण न झाल्यामुळें अतृप्तता तशीच राहिली. तूं कां रे आला नाहीस जयंत? कुठंही भाषण देणार अशी जाहिरात फडकवायची नि मग तेथें हजर न राहण्याची पुढारी वृत्तिही तर तुझ्यात बळावली नाही ना?'

संजयचं म्हणणं ऐकून मी बराच हंसत राहिलों आणि गालातल्या गालातच हंसत मी त्याला म्हणालों, 'सगळीकडे हिंडत हिंडत मी येथें आलों अन् मी तिथ येणारच तो मला फोनमधून सूचना करण्यात आली कीं, मीं आजच्या दिवशी तेथं भाषण न केल्यास उत्तमच. कारण संध्या-

काळीं कामगार-मैदानावर मजुरांच्या आजच्या प्रचंड संपाची सभा बोलावली आहे तेव्हा तेथेंही काही कार्यकर्ते बोलण्याकरिता ठेवण्यात आले होते. आणि म्हणूनच माझा तेथें येण्याला नाइलाज झाला.'

संजयच्या पिवळया नि चोपड्या चेहऱ्यावर शंकेचं समाधान झाल्याची छटा चमकली.

'×× कॉलेजमधल्या एका मुलीनं तर भलताच पराक्रम गाजविला बुवा आज!' संजीव नि अजय वगैरे एक एक आले अन् येताच ते वरील वाक्य उद्गारले आणि पुढें सांगूं लागले, "आम्ही त्या कॉलेजमध्ये गेलों तो आमचा कार्यकर्ता तेथे हजर नव्हता. पण पदर खोवलेली, लांब वेणीचा शेपटा सोडलेली नि करता येईल तितकी कणखर नजर करून एक तरुणी मात्र कॉलेजच्या सर्व मुलाना व्हराड्यात घेऊन उभी होती. अन् ती त्या सर्व मुलाना तावातावानं सागत होती की—मी सर्वांची प्रतिनिधि म्हणून प्रिन्सिपॉलकडे गेल्ये नि म्हणाल्ये, 'आज आम्हा सर्वांना सुटी पाहिजे आहे.' सनातनी प्रिन्सिपॉल भृकुट्या वर करीत म्हणाला,

'ती कशाबद्दल?'

'आज सर्व विद्यार्थ्यांनी हिटलरी आक्रमणाचा पूर्ण निषेध करण्याकरितां दिन साजरा करण्याचा विचार केला आहे म्हणून...'

'हे बघा, तुम्ही हे असले दिन साजरे करण्याकरिता कॉलेजांत येतां की शिकण्याकरिता? मी नेहमी पाहतों, काही न् काही तरी सामुदायिक तक्रार घेऊन तुम्ही माझ्याकडे येत असता. हिटलरचा निषेध करणारे तुम्ही कोण? अन् राजकारणाचा नि विद्यार्थ्यांचा संबंध काय? तें काहीं नाही. हे असले प्रकार येथं चालणार नाहीत. चला. सर्वजण आपापल्या वर्गावर चालते व्हा पाहूं. जा येथून.'

'आम्ही जाऊं पण वर्गांत नाही. तर बाहेरच्या त्या गार्डनमध्यें जमा होऊन त्या निषेधाबरोबर तुमचाही निषेध आम्ही व्यक्त करूं. समजलांत!' असं म्हणून ती तरुणी तेथून निघाली आणि खरंच आम्ही जाण्याच्या आधीं दुसऱ्या कार्यकर्त्यांच्या मदतीनं तिनं विद्यार्थ्यांचा संप घडवून आणला."

माझ्या सांकळलेल्या चेहऱ्यावर अधिकच हंसूं आलं नि मी म्हणालों,

'अरे वाः ! ब्रेव्हो ! भलतंच डेअरींग आणि आपल्या आतापर्यंतच्या विद्यार्थ्यांच्या इतिहासांत नवीनच भर ! कोण होती ती मुलगी अन् तिचं नाव काय ?'

तेव्हां विनय माझ्या जवळची रिकामी खुर्ची पुढें ओढून घेऊन तीवर बसत म्हणाला, 'असावरी धनंजय.'

मणिबेन मध्येच म्हणाली, "काय हो जयंत, तुमची नि तिची ओळख असेल वाटतं. कारण सभेत येऊन तिनं मला विचारलं होते, 'बेन ते हाटे नाही का हो आले इथं अजून ?' तेव्हा मी तिला विचारलं 'तुमची नि त्याची ओळख आहे काय ?' नंतर ती बऱ्याच वेळानं म्हणाली, 'तशी ओळख नाही हो, पण मला बघायचं होतं त्याना.' "

मी ह्या अनपेक्षित प्रसंगामुळे जरा बावरलों. काय उत्तर द्यावे तें मला सुचेना. मी डेनवर नजर नेली. तिचा चेहरा मोहक हास्यानं खुलला होता आणि तिच्या त्या विशाल विशाल नयनात माझ्या होणाऱ्या फजितीचं प्रतिबिंब दिसत होतं.

मी सर्वांकडे आळीपाळीनं पहात नि जरा गंभीर होऊन त्याना म्हटलं, 'हं एकंदरीत हे असे प्रकार घडून आपण विजय मिळविला तर !'

मणीबेन मध्येच म्हणाली, 'काय तरी बाई मुलगी ! एका क्षणांत तिनं पब्लीसिटी मिळविली सर्व ठिकाणी.'

जीवनकुमार बेनवर नजर रोखीत म्हणाला, 'मणी तिला का तूं नाव ठेवतेस ? बनारस ×× कॉलेजमध्ये तूंही असाच झाशीच्या राणीचा आव आणला होतास एकदा तो आठव ना !'

आता मात्र मणीबेन लाजली. लाजताना तिची सावळी मुद्रा एकदम चकाकली. जीवनकुमारकडे अधोमुख बघत नि मानेचा मुरका घेत ती म्हणाली, 'चल तुझं आपलं काही तरीच.'

आणि अशा रितीनं बाहेर मजूराच्या प्रचंड संपाबरोबर विद्यार्थ्यांच्याही संपाचं वादळ संपादकीय ऑफिसमध्ये दुपारी चहाच्या खडखडाटांत त्या दोन आक्टोबरच्या दिवशी विराम पावलं.

× × ×



बाल्टिक समुद्रावरील लहान राष्ट्रे रशियाशीं संधान बाधून साम्राज्य-शाहीचा डाव ओळखून होती. समाजवादी विचारसरणीनं जनतेचा कल बघून रशियाने फिनलंडच्या राजसत्तेला आपल्या वर्चस्वाखालीं येण्याबद्दल खलिता पाठवला होता.

आपल्या हिंदुस्थानचं राजकारण घोगड्यासारखं भिजत पडलं होतं. त्यात पुढें पाऊल पडण्याची काही काही आशा तर काही काही माघार स्पष्टच दिसत होती.

युद्ध सुरू होताच नेहरूनी जाहीरनामा काढला. वर्ध्याच्या बैठकीत आठ दिवसाच्या आतच युद्धविषयक धोरण ठरविण्याचा विचार करण्यात आला. नेहरू, आझाद आणि पटेल याची युद्धकमेटी नेमण्यात आली ब्रिटनमध्ये हिंदुस्थानविषयक मदतीच्या मोठमोठ्या आशा धरण्यात आल्या अन् त्यावर गाधीप्रभृतीच्या शब्दाशब्दाच्या नि व्हॉइसरॉयच्या कागदी घोड्याच्या शर्यती झडूं लागल्या. फेडरेशनच्या योजनेत हवा असलेला फेरबदल करण्याच्या गोष्टी न काढता तीविषयीं निरनिराळ्या पक्षाच्या पुढाऱ्याना आपल्या जाळ्यात ओढण्याची अविश्रात खटपट चालू होती.

नंतर व्हॉईसरॉयनी आपला जाहीरनामा बाहेर काढला. ज्यात काही आश्वासनं तर नव्हतीच पण हिदुस्थानबद्दल सर्व उदासीनताच भरली होती. १९३५ च्या पार्लमेंटमध्ये हिदुस्थानला प्रान्तिक स्वयात्तता द्यावी का नाही हा जो जोर मारण्यात आला होता त्याची री ओढून व्हॉईसरॉयनं सर्व राजकीय पुढाऱ्याना 'सध्या आम्हाला बिनशर्त मदत करा नि आम्हाला विजय मिळाला की तुम्हाला संयुक्त घटना दे ण्यात येईल' अस जाहीर केलं होतं.

अशा रितीच्या वाटाण्याच्या अक्षता लावल्यामुळं गाधी बरेच अस्वस्थ झाले आणि त्यानीं त्याना जे उत्तर दिलं ते त्याच्या उत्कृष्ट स्वातंत्र्यप्रियतेचं एक उदाहरण होत.

कोणतीहि राजकीय संस्था—जी सर्वथैव राष्ट्रीय आहे आणि जिच्या आदर्शामाग सबंध जनप्रवाह आहे अशा कॉग्रेसन गाधी-व्हाइसरायचा पत्र-

व्यवहार व सारा पेंच-प्रसंग पाहून आक्टोबरच्या शेवटच्या आठवड्यांत वर्ध्याला एक तातडीची बैठक बोलावून ठराव पास केला. साऱ्या कार्यकर्त्यांनी मोकळं काम करण्याकरिता सर्व प्रातातल्या कॉंग्रेसमंत्रिमंडळानीं राजीनामे द्यायचा ठराव आणि १९२१ च्या अहमदाबाद कॉंग्रेसनें ठरविलेला ठराव पुढें आणण्यात आला आणि एकमतान पास करण्यात आला.

जनतेत वातावरण बरेच उत्साही बनलं होतं. सर्व ठिकाणी तीच तीच चर्चा चालू होती. युद्धाचा परिणाम प्रत्येक व्यक्तीवर होत होता. महागाई, दारिद्य देशात जास्त फैलावूं लागलं. आता कशा का रितीनं होईना लढा सुरू व्हावा अन् आलेल्या संधीचा अवश्य फायदा घेऊन स्वातंत्र्य मिळविण्याचा खच्चून प्रयत्न करावा असं समाजातल्या प्रत्येक व्यक्तीला अन् कोपऱ्याकोपऱ्यातल्या प्रत्येक रहिवाशाला वाटत होतं.

मी घराबाहेर पडलों. मला एका कॉंग्रेस पुढाऱ्यानं बोलाविलं होतं. खादीचा सूट मी चढविला होता. केसाच्या बटा स्वैरपणे कपाळावर नाचूं लागल्या होत्या अन् मन भरीव विचारानं भारावून गेलं होतं.

मी कॉंग्रेस हाऊसमध्ये पाय ठेवला मात्र तोंच पुरुषोत्तमदास श्रॉफ मला मोटारीकडे परत येताना दिसले. ते मला पहाताच हंसले की त्याची ती पाढऱ्या चौकटीच्या चष्म्याची लठ्ठ कांच चकाकली हे मला कळलं नाही पण हस्तान्दोलन करून जेव्हा ते मला म्हणाले, 'हॅल्लो भाई हाटे, बराच उशीर केलांत तुम्ही!' तेव्हा घड्याळाकडे पाहून मी त्याना काही उत्तर देतांच त्याच्या लठ्ठ चेहऱ्यावर मला साधारण विलासी झाक दिसूं लागली. मीं हंसऱ्या चेहऱ्यानं प्रतिहस्तान्दोलन केलं. ते आपला जरठ अरुंद पंजा माझ्या साधारण मऊ हातावरून दूर करीत म्हणाले, 'चला ना माझ्या घरींच. तिथेंच बसूं आपण खूप बोलत.'

'ज्वाला'चा नुकताच बाहेर पडलेला अंक त्यांच्या हातांत होता. 'आमचा पुढचा मार्ग' हा माझा अग्रलेख त्यात होता आणि जीवनकुमाराचा 'कॉंग्रेस स्वातंत्र्याच्या मार्गाकडे' हाही लेख त्यांत होता. हे दोन्ही लेख सद्यःकालीन परिस्थितीची पुरेपुर जाणीव करून देत होते. मुखपृष्ठावर मणिबेनचें व्यंग्यचित्र दिले होतें. बंदिशाळेत साम्राज्यशाहीचा रखवालदार दाखविला होता. अन त्यासमोर हिटलर नि स्टॅलीन पायाखाली

कांहीं तरी कुचलण्याचा प्रयत्न करीत होते. पायाखाली कुचलत होतें त्याचं नांव होतं 'शातता नि विषमता.' त्या बंदिशाळेंतून बाहेर पडणारा एक गृहस्थ दाखविला होता. त्याचं नाव होतं 'स्वतंत्र हिंदुस्थान!' किती मार्मिकता होती त्या व्यंग्यचित्रांत!

मोटार चालू होतांच श्रॉफ त्या अंकातील त्या चित्राकडे पहात म्हणाले, 'खरंच हाटे, चित्राची कल्पना सुंदर आहे पण असं संधिसाधुःपणाचं धोरण जर आपण अमलात आणलं तर तें कितपत फायदेशीर पडेल हा प्रश्न आहे.'

"फायदेशीर न पडायला झालं काय श्रॉफजी? आमच्या मागं केव्हढी मोठी संघटणा आहे. नुसत्या एका ललकारीचा आवाज कीं विरोधकांना 'दे माय धरणी ठाय होईल.'"

'पण आतां परत गांधी-व्हॉईसरॉयमुलाखत होणार आहे म्हणे अन् कॉंग्रेस 'संयुक्त घटना' समितीचें बील पुढं ठेवणार आहे. मला वाटतं भाई, 'संयुक्त घटनासमिति'ची योजना फैजपूरच्या कॉंग्रेसमध्यें कॉ. रॉयनी माडली होती पण त्या वेळेस म्हणे कॉंग्रेसनें त्याचा प्रतिकार केला अन् आतां...'

'श्रॉफजी आपण चुकता आहात. मला वाटतं पहिल्यांदां ही योजना मूळ स्वरूपात पं. मोतीलाल नेहरूंनी पुढं आणली होती. कांहीं का असेना 'संयुक्त घटना समितीची' योजना मला पसंत जरी असली तरीपण अशा वादविवादातून आम्हांला कांहीं मिळणार नाही. आणि आम्ही तर अशा थराला आलों आहोंत की जिथं सलगीची भाषा बंद पाडली पाहिजे. No compromise at all.' मी खवळून म्हणालों.

'पण कॉंग्रेसनं सत्याग्रही लढा चालविला तर तो तुम्ही कशा स्वरूपात लढणार? तुम्हाला वाटत असेल, एकदा लढा सुरू झाला की मग सूत्रं आमच्या हातांत येतील. पण हाटे, गांधी पक्के वस्ताद आहेत. मागच्या वेळेस त्यांना पुरेपूर कळून चुकलं आहे. पुरा अनुभव आला आहे त्यांना तुम्हा लोकाचा. तुमची खळबळ नि तुमचा जोश त्याना कळत आहे अन् प्रत्येक कॉंग्रेस कमेटींतून नि रोजच्या पुढाऱ्याच्या माहितीवरून त्यांनी पक्कं हरून-ठेवलं आहे. तुम्ही कांहीं करणार असलात तर ते शात रहातील अन्

ते कांहीं करणार असतील तर तुम्हाला ते अशा तऱ्हेनं वागण्यास लावतील की तुम्ही त्याचे पाईक व्हाल.'

'श्रॉफजी, हा तुमचा भ्रम आहे. आम्ही वाट पहात बसूं पण फार कमी. गाधी गट जर कांहीच करीनासा दिसला आम्हाला तर आम्ही आमची मोहीम पुढे ढकलूं.'

'भाई हाटे, माझा तुमच्या सर्व गोष्टींना पूर्ण पाठिंबा आहे. मागच्या १९३७ च्या प्रक्षोभकारक मजूराच्या मागण्यांत तुम्ही केलेला त्याग अन् धडाडी माझ्या पूर्ण परिचयाची आहे. त्या वेळेस कॉंग्रेस-मंत्रिमंडळ असताना सुद्धा मजुरांवर गोळीबाराचा अन्याय करण्यात आला अन् त्याचं प्रायश्चित्त तुम्हांला सहा महिने तुरुंगवास भोगावा लागून तेथल्या हॉस्पिटलमध्ये राहावं लागलं. पण त्या वेळेस तुम्ही मला दिव्य दृष्टि दिली अन् आपलं राजकीय कर्तव्य फार फार निराळ आहे असं मला वाटूं लागलं. भाई हाटे, आता जर तुम्ही तसलंच काही केलं तर मला विसरूं नका हं. हरकत नाही मी कॉंग्रेस गटातला असलो तरी. पण ह्या खादीच्या भपक्याचा अन् दिखाऊ देशभक्तीचा मला आता कंटाळा आला आहे आणि आतून तुम्हा लोकाना साह्य करण्याचा किती जरी विचार केला तरी आता कॉंग्रेस मंत्र्यानी राजीनामे दिल्यावर सर्वच अशक्य आहे.'

आम्ही आमच्या भाषणाच्या लांबीबरोबर रस्त्याचीहि लांबी कापीत श्रॉफच्या बंगलीपाशी येऊन पोंचलों.

श्रॉफ मोटारीतून उतरताच मला म्हणाले, 'भाई, पहिली जुनी मोटर तुमच्या पक्षाला अन् पुढाऱ्याना कामात आणण्याकरता दिली म्हणून मीं ही नवी मोटर घेतली आहे.'

श्रॉफच्या त्या भव्य दिवाणखान्यांत शिरेपर्यंत माझ्या मनांत विचार चालला होता. श्रॉफसारख्या बुद्धिवादी लोकाकडून आमच्या चळवळी-करतां पैसे अन् कार्य करण्या करिता मोटारी मिळतात पण आमचे विरोधक समाज नि पक्ष आमच्याशीं कोल्हेकुई करतात कीं 'मजूराच्या पैशावर हे हात फिरवतात म्हणून!' किती संकुचित मनानं बघतात ते अशा व्यापक चळवळीकडे!

मी जागा घेतांच नि समोर श्रॉफजी बसतांच मागील संभाषणाच्या

दुव्याचा संबंध लावीत म्हणालो, 'हं काय म्हणालात तुम्ही? आपण आपलं सहाय्य देऊं शकत नाही तर आम्हाला?'

'छे छे! तसं कुठें म्हणालों मी?· माझ्या म्हणण्याचा उद्देश इतकाच की तुम्ही काँग्रेसच्या आत राहूनच काम करूं इच्छिता न्? तर मग एक वार पुन्हा काँग्रेसला लढा लौकर सुरू करायला भाग पाडूं या अन् रामगड कॉंग्रेसपर्यंत दम धरूं या!'

'हो श्रॉफजी. मलाहि तसंच वाटतं. आपण तिथपर्यंत वाट पाहूं पण त्याचबरोबर इकडेही बी पेरीत ठेऊ. म्हणजे तिकडे जर बिनसलं—डाव्या नि उजव्या गटाचा लौकर रंग नच दिसला सुरवात करण्याचा तर आपण...?'

'हाटे,' श्रॉफजी गद्गदित होऊन माझा हात धरून म्हणाले, 'केव्हढी तुमची अचाट कल्पना नि रेखीव कार्यक्रम! पण अंती यश मिळेल ही आशा तुम्हाला आहे काय?'

'ओह! कुणी पाहिलं आहे पुढचं श्रॉफजी. पण प्रत्येक लढा हा एक शिक्षक आहे. आम्हाला असे लढे मधून मधून निर्माण करायला हवेत अन् भावी कालात होणाऱ्या लढ्याची तयारी निर्माण केली पाहिजे.'

'तुमच्या प्रत्येक गोष्टीला माझी तयारी आहे. हो, पण मी तुम्हाला बोलावलं आहे तें ह्या करिता की आतां पुढच्या रामगडच्या कॉंग्रेस करतां आपण प्रतिनिधि पाठविणार आहोंत तर कॉंग्रेसच्या तिकिटावर कामगार-पुढारी पाठविण्याकरिता उभे करा. प्रत्येक वॉर्डमधून जंगी तयारी करा. आपल्याच लोकाना मतं मिळतील अशी आतापासूनच योजना आखून ठेवा.'

'रामगडच्या कॉंग्रेसमध्यें प्रत्येक ठराव डाव्या पक्षाचे जास्त प्रतिनिधि हजर रहाण्यावर अवलंबून आहे. अन् अशा वेळेस आमच्या डाव्या गटातले जास्त प्रतिनिधि जमा झाले तर हाटे, तुम्ही सागता तें मग आपल्या हातात आहे.'

त्याची निवडणुकीची कल्पना अमलांत आणण्याचं आश्वासन देत नि त्याचा निरोप घेत मी त्याना म्हटलें, 'हॅलो श्रॉफजी सर्वच गोष्टी आपल्या हातात आहेत. वर्तमान आणि भविष्य दोन्ही आमच्या हातांत आहेत.'

---

# ५

पिवळं पातळ, पिवळाच ब्लाऊझ, त्या वस्त्रांतून दिसणारी ती तिची गौर काया, लांब सोडलेला शेपटा अन् वर केसांत खोवलेलं तें पिवळ्या चाफ्याचं फूल. किती मादक नि विलोभनीय दिसत होती ती.

आपण पेहरीत असलेल्या वस्त्रप्रावरणाचा आपल्याच मनावर मानसिक रीत्या परिणाम घडत असतो. नाहीं तर डेननें माझ्यावर ' प्रेम म्हणजे काय रे ? ' असा प्रश्न टाकला नसता.

किती घाबरलो मी तिच्या ह्या प्रश्नानं. मागें शिरीनबालेनं ह्याच वाक्याचा आधार घेऊन तिच्या अन् माझ्या पवित्र प्रेमाला काळिमा आणला होता. ती माझ्या आश्रयदात्याची मुलगी तर डेन आश्रयदात्याच्या मित्राची. मग एकुण काय ? मी आरशात बघितलं. मला जाणीव झाली. पुरुषाला मिळणारा सुंदर बाधा, गौर नि मोहक चेहरा अन् स्त्रियांच्या बाबतींत जरा मनमोकळेपणा अतिच वाईट.

डेन वाक्य उच्चारूनच थाबली नाहीं. ती पुढं येत म्हणाली, ' असं माझ्याकडे बघून विचार कसला करतोस ? जिम, माझा चेहरा दिसला कीं तूं म्हणतोस की मला सुद्धा सुंदर विचार सुचतात. खरं ना ? ' असं म्हणत तिनें नेहमीप्रमाणें आपले अधर माझ्या गालावर ठेवले अन् म्हणाली, ' नाही ना देत ह्या प्रश्नाचं उत्तर तूं ? जिम, हेच आहे त्या प्रश्नाचं उत्तर बरं का ? '

' पण जयंत, भिती वाटते मला. सुरू होणाऱ्या ह्या वर्तमानकाळाचं भवितव्य भयानक दिसतं. तूं माझ्यापासून दूर दूर हिरावला जाणार असल्याचीं चिन्हं दिसत आहेत मला. '

' म्हणजे ? झालंय काय तुला पेरीन, भलत्याच शंका काढून पुढे घडणाऱ्या गोष्टींबद्दल अविश्वास दाखवायला ? '

' नाहीं, जयंत, तसं नाहीं म्हणत रे मी. पण कॉंग्रेसनं पुढें मांडलेल्या ' संयुक्त घटनासमिती ' ला पाठिंबा दाखविणाऱ्या त्या कामगार-मैदानावरील प्रचंड सभेंत तूं जेव्हा बोलूं लागलास तेव्हां जमीन हादरूं लागल्याचा भास झाला मला. अन् तुझे सहकारी आपसांत कुजबूज करूं लागले कीं ' हे

हाटे क्वचितच अशा मोकळया सभेंत येऊन बोलतात पण जेव्हा ते बोलतात तेव्हां त्याचं भाषण बेताल होतं. मजूरांची मनं उंच उंच चढूं लागतात. अन् तो लाल झेंडा फडफडूं लागतो.' अन् त्यांच्या ह्या कुजबुजण्याचे पडसाद ठायीं ठायीं तुझ्या भाषणातून उठत नाहीत का ?'

'पण डेन तुला नाही वाटत की तसंच तिथं बोलायला पाहिजे म्हणून ? एवढ्या चाळीस हजार मजुरांना विश्वासांत घ्यायचं म्हणजे काहीं साधी गोष्ट का आहे ? आपण त्याच्या खोलीखोलीतून नि चाळींचाळीतून त्यांना आपल्या विश्वासांत घेऊन भरीव आश्वासनं देतों ते काय त्यातील कांहीं तरी जाहीरपणे न सांगण्याकरितां ? कॉंग्रेसनं प्रतिकाराचं धोरण जोंपर्यंत अमलांत आणण्याचं ठरविलं आहे तोंपर्यंत त्याचीच री ओढून आम्हीं त्याच्या दुप्पट प्रतिकाराची जाणीव नको का करून द्यायला त्याना ?'

'जयंत, ज्या एका क्षणापासून तुझी माझी दृष्टिभेट झाली तो क्षण अमर राहील. त्या वेळेपासून मी एकसारखी तुझ्याकडे ओढली जात आहे–तुझ्यात असलेल्या बौद्धिक असामान्यतेकडे मी झुकूं लागले आहें. मला वाटतं माझं आयुष्य निरस आहे. त्यात रसिकता येईल तेव्हाच की, जेव्हा मी तुझ्या कार्यात मदत करीन खूप खूप–तुला ध्येयशिडीवर चढवीन उंच उंच अन् तुझ्या गळयांत विजयोन्मादानं हात घालून तुझें गोड गोड चुंबन घेईन! जया, शरीरं एक बनलीं, मनं मिसळून गेलीं, पण तो प्रीतीचा दिव्य क्षण की ज्यानं पुरुषाच्या अन् स्त्रीच्या आयुष्याची सफलता होते तो क्षण, तो साक्षात्कार नाही का लाभणार मला तुझ्याकडून ?'

डेनच्या तरुणसुलभ मनाला आज निराळेच खेळ खेळण्याची लहर आली होती अन् तिनें आपल्या पोषाखानें माझ्यावर भुरळ पाडण्याची युक्ति योजली होती.

मी तिच्यापासून अलग होत म्हटलं, 'झालंय काय तुला आज ? आणि ज्या दिव्य क्षणाची तूं वाट पहातेस तो काही फार लाब नाही. मी तुझाच ना आहें ? पण डेन, तारुण्य ही अफाट शक्ति आहे. तिला आपण असंच खर्च करीत बसलों तर–तर–तर मग ती शक्ति की ज्या शक्तीनं मानवी रक्त सळसळून येतं, त्याच्या त्या सर्व इच्छा एकवटून आगेकूच

करण्याला लावणारी जी शक्ति ती शक्ति स्वर्गीय नाहीं असं कोण म्हणेल ? अन् ती शक्ति आपल्या असल्या वागणुकीनं स्थगित नाहीं का होणार डेन ?'

'जयंत, परवा तूं एकदाचा घरी येऊन गेलास. तूं आपल्या गोड बोलण्यानं पपाला किती रमविलंस. त्या वेळची तुझी ती हालचाल, तुझें तें विशाल कपाळ, त्यावर भुरभूर उडणारे केस, डोळ्यांतलं तें तेज, अन् तुझा तो गोल नि लाबट चेहरा अन् दोन्ही हाडं पुढें आली असूनही मऊ मऊ गाल बघून अन् तुझ्या गप्पा ऐकून मला वाटलं हा जिम नि बाहेरचा जयंत हाटे निराळे. त्या वेळेस किती घरगुती वातावरण निर्माण केलं होतंस तूं. जिम, पपानी मला सांगितलं बरं का, तुझ्यापासून त्यानी काय आश्वासन घेतलं तें !'

'म्हणजे ?' भोळा भाव दाखवीत नि हंसऱ्या चेहऱ्यानं तिच्याकडे बघत मी म्हटलं, 'मला नाही कळलं तूं काय म्हणत्येस तें.'

'हं. आता कशाला कळेल ? पण पपा म्हणाले बरं का मला, डेन, धरून ठेव नीट याला ! सोडूं नकोस दूर याला. नाहीं तर तुझ्या हातावर देईल तुरी अन मारील कुठली तरी दूरची भरारी.'

'डेन, भलतंच काय बडबडत्येस तूं आज ? झालंय काय तुला इतका आनंद व्हायला ? का तुझ्या मैत्रिणीकडे एखादा नाजूक समारंभ आहे एव्हढी नटली सजली आहेस ती !'

'अं हं, वेड्याचं सोंग बाकी फारच नामी साधतं हं तुला जिम. अरे हो ! पपाचा निरोप द्यायला आले होते मुद्दाम अन् मैत्रिणीचं कर्तव्य बजवायला !'

'आश्वासनाबद्दलच आहे का कांहीं ?'

'हो. त्यापैकीच पण जरा निराळं.'

'म्हणजे ? आहे तरी काय हें गूढगुंजन !'

'पपांनी सांगितलंय कीं शिरीनबालेचं त्यांना पत्र आलंय अन् ती परवां येणार आहे कलकत्त्याहून इथं. ऑपेरा हाऊसमध्यें डान्स आहे तिथं तिनं तुला नि मला बोलावलं आहे. मग जाऊं या का आपण तिकडे ?'

'डेन, पुन्हा तूं असले प्रसंग आणत्येस माझ्यापुढें. आपण तिला भेटायला जाऊं पण नाचाला नको बुवा ! तिला भेटायचं मला अगदीं

जिवावर आलंय. जिथं धागे तुटले आहेत अन् विचका झाला आहे अशा ठिकाणी पुन्हा गुंफण्याची शिताफी हवी कशाला ?'

"पण जयंत, तिचा फक्त एकच दिवस मुक्काम आहे. तिनं अगत्यपूर्वक बोलावलं असताना आपण जर न गेलों तर तिला अत्यंत वाईट नाहीं का वाटणार ? तिची अन् तुझी दिलजमाई जरी नसली तरी तूंच तिला आधार आहेस ना एक ? जेव्हा नातेवाइकाचे प्रश्न तिच्या समोर येतील तेव्हां तुझ्याचकडे ना पाहील ती आशेनं. मुंबई सोडतांना ती माझ्याकडे आली होती. किती दुःखानं भरलं होतं तिचं अंतःकरण अन् किती जाणीव करून दिली तिन तुझ्यावरील प्रेमाची ! जयंत, ती तुझ्यावर प्रेम करीत होती. पण ज्या प्रकारच प्रेम तिला तुझ्याकडून हवं होतं ते तूं तिला दिलं नाहीस. स्त्री पुरुषावर एकदांच प्रेम करूं शकते. ती म्हणाली होती, 'पेरीन, मी जयंताला प्रेमाचं फूल वाहिल. त्यानें त्याचा स्वीकार केला, पण मला नको असलेल्या रितीनं. आता त्याची साक्ष म्हणूनच मी एकटी रहाणार, कलेला वाहून घेणार अन् ज्या कलेला मी आत्मसात् केलं आहे त्यानंच मी जगाला दिपविणार ! आता मी कदाचित् वर्षन् वर्षं जयाला भेटणार नाही. तेव्हां तुलाच त्याचा साभाळ करावा लागेल. करशील ना डेन. अन् जेव्हा मी येथं रूप अन् कीर्ति घेऊन येईन तेव्हा येशील ना तूं घेऊन त्याला माझ्याकडे ? करशील ना एव्हढं मित्रकार्य डेन ?' "

किती खोल हृदयातून आले होते हे शब्द ! डेनच्या ऐवजी बालाच बोलत असल्याचा मला भास झाला. 'डेन, तिच्या सहवासात घालविलेले दिवस मी कधीच विसरणार नाही. पण तिच्या बाबतींत स्वीकारलेले धोरण आकुंचित आहे असें मला वाटत नाहीं. तिनं मात्र,' मी दुःखाचा आवढा गिळीत म्हटले, 'तिनं मला पोरकं केलं. ह्यानंतर ह्या अफाट विश्वात असणारं जिव्हाळ्याचं नातं तिनं तटातट तोडून टाकलंन्...'

डेनच्या डोळ्यात अश्रु तरारले होते. मी तिचे अश्रु पुशीत म्हटलं, 'डेन, तुझी तशीच इच्छा असली तर आपण जाऊं या. पण तुला निश्चित नि केव्हां येणार तें कळल्यावर मला घेऊन जायला ये हं, युनिअनच्या ऑफिसमध्ये ! अन् हे बघ तिला यायला अजून चार पाच दिवस तरी असतील. कारण वर्तमानपत्रात तिच्या केव्हढाल्या जाहिराती फडकत आहेत.

त्यावरून तिला यायला अजून वेळ असावा.'

'हो. मींहि त्या वाचल्या आहेत. नाहीं तरी या कलावंतांना आपल्या जाहिराती आपण देण्याची नि लोकाना उत्कंठा लावण्याची संवयच असते मुळीं!'

'डेन, मला वाटतं, तूं फार उतावीळ झाली आहेस तिला भेटायला. भूक आणि झोंप तरी सुचते का तुला?'

ती उठली अन् आनंदात येऊन म्हणाली, 'बघ, माझं काम फत्ते झालं ना आज. हं. मग ठरलं ना तुझं येण्याचं? नाहींतर ऐन वेळेस आढे-वेढे घेण्याची नि मग मन उदास करून होकार देण्याची संवय जडली आहे तुला.'

'ज्या ठिकाणाहून तिचा तो फार दाट शेपटा लोळत होता त्या ठिकाणचं ते पिवळं फूल घेतलं अन् त्याचा वास घेत मी तिला म्हटलं, 'हं ठरलं.'

डेन गेली खरी, पण आज तिनं अप्रत्यक्षरीत्या मला भूतकाळचा पडदा दूर सारून माझ्या गतायुष्याचा जीवनपडदा आपल्या उघड्या डोळ्यानंच बघायला मदत केली.

# ६

शिरीनबाला !

डेन जाताच मीं खोलीचीं दारं लावून घेतलीं व सिगरेट शिलगावली. त्या धुरात, वाऱ्याचा झोत न मिळाल्यामुळें साचलेल्या नि जमा झालेल्या माझ्या भोंवतालच्या ढगमय धुरात मला माझ्या गतायुष्याची अंधुक अंधुक आठवण होऊं लागली. त्या उच्छृंखल मुलीवर पवित्र प्रेम करण्याचा तो प्रसंग !

छे भूतकाळांतली भविष्यकाळ बनवणारी ती अघटित घटना !

कुणीतरी कुठं म्हटलं आहे, ज्याचा वर्तमानकाळ रेताड असतो त्याचा भविष्यकाळ भयाण नसतो. त्या वर्तमानकाळातच तो भविष्यकालात निर्माण' होणाऱ्या नंदनवनाची रूपरेषा आखीत असतो. किती अर्थपूर्ण आहेत ही वाक्यें ! उच्च शिक्षण मिळविण्याच्या हिरहिरीनं पोरका झालेल्या माझ्या-सारख्या अजाण मुलाने विदर्भातल्या त्या साधारण पुढारलेल्या गावातून किती नि केवढ्या लवकर सुटका करून घेतली !

मुंबईला येऊन किती भटकलो. किती हालअपेष्टेंत दिवस काढले अन् किती काढल्या त्या उपासमाऱ्या ! पण त्या चकाकणाऱ्या भवितव्यानं मला रावबहादूर आगाशे याच्या निर्मल नि उदार मनात जागा दिली.

' जयंत, अगदी मोकळ्या मनानं रहा हं तू इथं अन् खूपखूप शिकून शहाणा हो अन् माझ्या पैशाचं नि सहाय्याचं सार्थक कर. ही बघ ही बाला ही तुझी बहीण हं. नुकत्याच मुकलेल्या तिच्या बंधुप्रेमाला तूं जागं कर.' किती पवित्र बंधनाची जाणीव करून दिली होती मला दद्दानी !

पण हाय ! हाय ! त्या यौवनाच्या मर्यादा कालावर मात करतात. त्यांतील अति आकर्षक जादू पवित्रतेचा नाश करते. माणसाच्या सुसंस्कृत मनांना भ्रष्ट करते—

आश्रयदात्यानं आश्रय दिला होता. पण त्याचं कुटुंब अफाट होतं. त्यावर दरारा जरी दद्दाचा होता तरी पण मी आणि माझे व्यक्तित्व सर्वांच्या डोळ्यांत खुपत होतं. माझ्या खोलीबाहेर, त्यांच्या त्या अफाट बंगल्यात कोणीकोणी सलगीचं नव्हतं. पहिल्यापाहिल्यादा मी किती

घाबरलों, चहाचा कप हातांतून गळून पडला पहिल्यांदां तेव्हा. त्यांच्या घरची ती खवचट सासू किती टाकून बोलली मला! अपमान सोसून अन्न खाण्याचं ते जिणं! मी खोलींत आलो. दार लोटून घेतलं नि तोंडाला उशी लावून रडूं लागलो होतों मी.

पण जेव्हां सगळीकडे अंधार अंधार दिसतो तेव्हां त्यात आशेची एकतरी तारका चमकतेच. शिरीबालानं आंत पाऊल टाकलं. मी बघितलं. तिच्या चाहुलीनं मी सावरलों. पण किती घाबरलों मी तिला असं एकाकी येतांना बघून. ती माझ्या पाठीवर हात ठेऊन नि अश्रु पुशीत म्हणाली, 'जया, तूं आल्याला आज दोन महिने झाले आहेत. मी सर्व वागणूक बघत आहें रे; पण—काय करूं? माझ्या दादाला देखील ह्या लोकानी असाच त्रास दिला. काळजीमुळं अन् कुढत राहिल्यामुळे तो आजारी पडला अन् त्यांतच त्याचा......' तिनं हुदका भरला होता अन् अप्रत्यक्षरीत्या मला तिला सावरणं अन् तिनं माझ्या बाबतींत करून दिलेली 'सहानुभूतीची' साभार पोच करून देणं भाग होतं.

'जया, मला गाता अन् नाचताहि येतं हं. दद्दानी बंगाली शिक्षक नेमला आहे एक माझ्याकरता. किती किती सुंदर शिकवतो तो नृत्यकला! पुराणकालातील नृत्यकलेपासून तो आधुनिक बॉल्सपर्यंत सर्व काही येतं त्याला!'

'जया, किती अबोल आहेस रे तू.' माझ्याकडे बघत बाला म्हणाली, 'तूं आल्यापासून दद्दानी मला किती तरी वेळ सागितलं कीं, जयंतवर सारखं लक्ष ठेव म्हणून. नाही तर तूं राहशील आपल्याच नादात अन् त्याची होईल हेळसांड. पण काय बाई तरी तूं! कॉलेजातून तूं येतोस तो आपल्या खोलींत दारं लावून बसतोस! जेवायला येतोस तें किती बावऱ्या नि भिऱ्या वृत्तीनं! तेथून पुन्हा आपल्या कोठडींत. सदान् कदा अंधाऱ्या खोलींत बसावंसं वाटतं का रे तुला नेहमी?'

'तसं नाही बाला. कुणाशी अन् काय बोलायचं? मी तुझ्याशीं बोललों नाहीं असं कधीं झालंय काय? जेवायच्या वेळेस तूं बोलतेसच. मला हव्या असलेल्या वस्तूंचा पुरवठा करण्याचा ठेकाच घेतला आहे मुळीं तूं. अन् परवां तुझ्याबरोबर मोटारींतून कापडाच्या दुकानांत जाऊन कापड

खरेदी केलं तेंही काय तुझ्याशीं बोलल्याशिवाय?'

'त्या बोलण्यांत आणि आजच्या बोलण्यांत किती फरक आहे जया! आज मी तुला जया म्हणून हाक मारीत आहें अन् तूं मला बाला म्हणून.'

ती उभी राहिली. तिनं कॉटजवळ असलेला लॅम्प शिलगावला अन् खोलींतला मंदमंद दिवा विझवून टाकला.

शिरीनबाला किती रम्य दिसत होती त्या रम्य प्रकाशात! तिची ती कलात्मक आकृति, आकर्षक रहाणी, ठेगणा टुसटुशीत बाधा अन् चंचल काया! सदोदित बेल्ट लावल्यामुळे तिचा तो उंच असूनही उशीसारखा दबलेला वक्षःस्थळ, गोल चेहरा, मादक नयन, एका बाजूच्या उंच कपाळा-मुळे तिचा थोडासा वर चढलेला केशकलाप, तिचे ते चेहऱ्यावरचीं हाडं झाकून टाकणारे अन् मादक नयनाची पूर्ण जाणीव करून देणारे मऊ मऊ गाल, नाजुक जिवणी नि कोमल अधर! ती सुन्दर दिसत होती, पण जास्त मादकपणामुळेच.

मी तिच्या त्या कमनीय शरीराचं अन् रेखीव अवयवाचं अजाणता निरीक्षण करीत होतों.

तितक्यात ती माझ्याजवळ आली नि म्हणाली, 'जया, आतां असं काही नाहीं होता कामा. तूं नेहमी माझ्याबरोबर असायचं. माझ्या नाचाच्या नि गाण्याच्या खोलीत येऊन तूंहि त्यात मोकळ्या मनानं भाग घ्यायचा बरं का? आपलं आयुष्य किती रे कमी आहे जया? अन् भोव-तालच्या लोकाची वागणूक नि ती त्याची मत्सरवृत्ति अन् थोड्याशा नाजुक बाबतीत गोंधळ उडवून गैरसमजानं माणसा-माणसाना शत्रु बनवून त्याना कसं रे जगावंसं वाटतं? मला आपली मजा मजा करावीशी वाटते. आयुष्य ही एक जगण्याची, खेळ खेळण्याची कला आहे. जो हा आयुष्याचा खेळ सुंदर रितीनें खेळतो तो जगतो अन् जो जगतो व आपल्या जगण्याच्या खेळण्यातल्या संवगड्यांना आनंद देतो नि आपण आनंद घेतो तो अमर बनतो.'

तिच्या कल्पनारम्य तत्त्वानं माझं मन बरंच उत्साहि बनलं. मी तिला विचारलं, 'बाला, तुझ्या त्या सावत्र आईला पटतं का हें? अन् तुझी ती आजी, बापरे! मला भिती वाटते. तिचा तो भयंकर स्थूल देह, ओबडधोबड

नि लठ्ठ चेहरा अन् आगीसारखे मत्सरानं धगधगणारे नि प्रत्येक माणसाला खाण्याकरितां टपलेले डोळे!!'

'हा? हा! तुलाहि छानच नक्कल नि स्वभाव रेखाटता येतात बरं का जया. तुझ्यासारख्या लेखकाला येऊं नये तर कुणाला बाबा?'

'म्हणजे?'

'तुझ्या माघारीं मी तुझे सर्व प्रसिद्ध झालेले इंग्रजी नि मराठी लेख वाचून काढले आहेत अन् दद्दाना ही बातमी कळविली बरं का जया!'

मी ऑ वासून नि हतबुद्ध होऊन तिच्याकडे बघतच राहिलों.

मीहि तरुण अन् शिरीनबालाहि तरुण. यौवनाच्या बेभान रसात माणूस जेव्हा एकरूप होतो तेव्हा सामान्य माणूस त्यातच पोहत राहून तो आपल्या आयुष्यात जो एक मानवी बुद्धीला कर्तृत्वाचा अन् असामान्यत्वाचा लाभणारा गुण असतो त्यास हिरावतो, लाचार होतो. अन् क्षुब्धपणे नि निःस्तब्धपणें त्यांतच आपलं आयुष्य खर्च करतो. पण तोच असामान्य माणूस अशाच प्रसंगातून आपल्या इच्छा-आकाक्षांचे मनोरे बांधतो—प्रणयातून मिळणाऱ्या बेभान शक्तीनं तो आपले कर्तृत्वाचे अन् बुद्धीचे सागर निर्माण करतो अन् ह्या विरोधी आकर्षणातूनच तो त्यावर ध्येयाच्या नौका वल्हवायला सुरवात करतो.

× × ×

मी सहज एकदां दिवाणखान्यांतून जाता जातां दद्दाचें नि शिरीबालेचं बोलणं ऐकलं. दद्दा म्हणत होते, 'बाले, जयंत फार भाग्याचा आहे हं. तो येताच मला 'रावबहादुर' पदवी मिळाली.'

'दद्दा, डेनच्या पपानासुद्धां 'नाईटहुड' मिळालं न् मीं तर डेनला फोन करून अभिनंदन केलं पपाचं!'

'अरे! चकवलं कीं बाले तुला तिनं. तुझ्या आधीं तिनं मलाच फोन करून अभिनंदन केलं माझं. किती धीट आहे ती!'

'काय तरी बाई! अशी काढीन कीं नाहीं आता भेटली म्हणजे!'

'अरे पण बाले, जयाची अन् आपल्या बरोचा कुटुंबाची ओळख करून दिली आहेस तूं आपसात! डेन त्याला एका क्षणांत बोलकं करील बघ.'

'कांहीं नको हं तिला पुढाकार घ्यायला. दद्दा, मींच लावलंय त्याला बोलायला. इतकंच नव्हे तर नाचायला अन् गायलाहि पण लावलं. कॉलेजमधल्या डेबेटिंगमध्यें त्याला व्यासपीठावरून बोलायला देखील लावलं मी ! आता परवांच तो सांगत होता कीं, कोणत्याशा विद्यार्थी-संघाचा त्याला सर्व विद्यार्थ्यांनीं पुढाकार देऊन चिटणीस केलं आहे आपल्या संघाचं.'

'अरे वा ! बरीच कामगिरी केलीस तूं. पण तूं जसं मध्येंच कॉलेज सोडलंस तसं त्याला नको सोडायला लाऊंस हं बाले भलत्याच फंदात पाडून !'

दद्दाचा स्वभाव फारच गोड. त्याची ती उंच पण कृश शरीरयष्टि, भव्य कपाळ पण वर पडलेलं टक्कल, चादीच्या फ्रेममधील त्यांची चाळशी अन् त्यातून कौटुंबिक सौख्याला हपापलेली त्याची ती नजर ! ते बसलेले असले कीं त्याचे ते उठून दिसणारे मिशाचे कल्ले. कुणालाहि त्याच्याबद्दल पहिल्यांदा आदरयुक्त भीति वाटे. पण ती तात्कालिक. जरा का त्यांनी नजर उठवून परिचिताकडे बघितलं कीं तो देहभान विसरून बोलूं लागत असे मनमोकळेपणें अन् त्याच्या त्या किंचित् विशाल छातीकडे बघत असे तो टक लावून कांहीतरी मिळेल ह्या आशेनं अन् तो परत जात असे आपल्याला पाहिजे असेल ते मिळाल्याने.

× × ×

कालाची गति, पाण्याचा प्रवाह अन् जीवनाचा वेग अखंड चालू आहे अन् जोंपर्यंत ह्या नश्वर जगात पाऊस पडत राहील आभाळातून अन् धान्य उगवेल जमिनीतून तोंपर्यंत चालूच राहील.

अंधारातून आलेल्या अन् पुन्हा अंधाराकडे चाललेल्या माझ्या ह्या जीवनग्रंथीचीं पानं मोहक प्रसंगानं, संघर्षानं, मानवी मनाच्या उच्चतेनं भरलीं जात होतीं.

रावबहादुराच्या घरातल्या त्रस्त वातावरणातून माझं मन बाहेरच्या विशाल जगात भटकूं लागलं होतं अन् त्या विशाल जगात कल्पनारम्य नि उंच उंच स्थान पटकाविण्याचा निश्चय, बालेचा प्रेमळ नि मनमोकळेपणाचा स्वभाव नि सहवास पटवून देत होता.

मी पुढेंपुढें विद्यार्थ्यांच्या चळवळींत भाग घेऊं लागलों. माझ्या

कांहीं मित्राच्या प्रेमळ स्वभावानं नि त्याच्या मला नेहमीं पुढेंपुढें खेंच-
णाऱ्या वृत्तीनं माझ्यांत अमर्याद चलाखी आली होती.

मला काय पाहिजे होतें ? विद्यार्थ्यात मी मानाची जागा पटकावली होती. अभ्यासात पदवी मिळविण्याच्या अगदीं मार्गावर होतो. पण आता अभ्यासाला असणाऱ्या त्या लठ्ठलठ्ठ ग्रंथाशिवाय की ज्यांनी मला नवी दृष्टि दिली, त्या ग्रंथाच्या अभ्यासानं मला झोंपेतून जागं केल्यासारखं वाटू लागलं. माझे मित्र मला म्हणत असत, 'जयंत, तुझं भवितव्य सुंदर आहे. ज्या विद्यार्थ्यांना तूं जागं केलंस त्याच अथाग माणसाना तूं पुढं जाग करशील. त्याच्यात गतानुगतके झोपलेल्या त्याच्या वृत्तीला तूं जागें करशील. त्याना नवचैतन्य देऊन त्याना कार्यप्रवण करशील.'

आज ह्या घटकेला सिगारेटचा धूर सोडीत मी विचार करतों, मित्रांचे ते उद्गार किती सत्य आहेत !

पुढेंपुढें मला लठ्ठलठ्ठ पुस्तकें वाचायचा नि समाजसत्तावादी अभ्यास-मंडळांत जाऊन भाग घेण्याचा जेव्हा फारच नाद लागला तेव्हा मला वाटतं शिरीबालेनं माझ्यापुढें भीति व्यक्त केली होती एकदा.

मी वाचीत असतां ती आली नि म्हणाली 'जया, मला बाई भिती वाटते आता तुझी. तूं ही असलीं मोठी पुस्तके वाचूं लागलास न् त्यातच रमूं लागलास म्हणजे मला वाटतं तूं फारफार दूर जाणार माझ्या पासनं अन् लौकरच विसरणार मला.'

ती कधींकधीं पुस्तकं माझ्या हातांतून हिसकावून घेत असे अन् तिला आवडणाऱ्या माझ्या विशाल कपाळावर आपले नाजूक अधर ठेवून म्हणत असे, 'चल ना नाचाला. आपण दोघं मिळून नाचूं आज !'

मला स्त्रीस्वभावाची, माझ्या आयुष्यात पहिल्यादाच आलेल्या शिरीबालेची मजा वाटत होती. ती माझ्यापेक्षां तीन वर्षांनीं वडील होती. पण माझ्याशीं वागताना किती अल्लडपणानं वागत होती ती. जणूं काय एखादी लहान बालिकाच !

तिचीं ती कलात्मक बोटं वाद्य वाजविण्याकरितां किती उतावीळ असत सदा ! तिची ती जलद वांकणारी पीत काया ! किती वाऱ्यानं

झुलणाऱ्या लतेप्रमाणं सहज वाकताना दिसे ती छुमछुम नाचताना.

× × ×

मी कॉलेजमधल्या माझ्या सहकारी विद्यार्थ्यांच्या घोळक्यात बसून गप्पा मारण्यांत दंग होऊन गेलो होतो. इतक्यात एक पारशी मुलगी तिथं आली नि तिनं धीटपणानं निं जरा बावऱ्या नजरेनं सर्व मुलाना प्रश्न केला, 'जयंत हाटे कोण आहेत ह्यातले ?'

मी पुढे होत म्हटलं, 'काय काम आहे आपलं ? मीच तो.' ती जरा धीटपणे म्हणाली, 'आज जो डिबेटींगमध्ये, 'स्त्रियाचं समाजात स्थान' हा विषय नेमला आहे ना, त्यावर मी बोलणार आहे. कृपा करून लिहून घ्या माझं नाव !'

मीं पेन घेऊन कागदावर रोखताच ती म्हणाली, 'पेरीन बरोचा एफ. वाय. सायन्स.'

तिनं नाव सागताच मी जरा गोंधळलों अन् इतक्यात माझ्या पेनचं झांकण जमीनीवर पडलं. आम्ही दोघेही ती लहानशी वस्तु हस्तगत करण्याकरिता खाली वाकलो पण त्या गडबडींत माझा चेहरा तिच्या केश-कलापाला स्पर्शून गेला. पेनचं झाकण माझ्या हातात देत ती म्हणाली, 'ह्या अफाट विश्वात स्त्री अन् पुरुष म्हणजे छाया–प्रकाश आहेत. जीवन सर्वंकष करायचं असेल तर दोघाना समाजात बरोबरीच स्थान पाहिजे.'

तिचं ते वाक्य ऐकून मी आश्चर्यानं तिच्याकडे पाहूं लागलों. तिचा तो अति उंच बाधा, बोलण्याची गोड शैली, नयनाची आतुरता अन् सदैव लकाकणाऱ्या तिच्या साधारण त्रिकोणी अन् मोहक चेहऱ्यावरचं ते स्मित, अन् त्यातून दुसऱ्याची नजर रोखून घेणारी ती गालाची मोहक खळी. तिच्या पहिल्या दृष्टभेटीत तिनं मला आपलसं केलं. मला तिच्याबद्दल आकर्षण वाटलं अन् त्याच वेळेस माझ्या मनांत काहूर उठलं. बालेवर माझें प्रेम आहे पण पेरीनच्या पहिल्याच नजरभेटींत जी आतुरता अन् नवीन संदेह होता तो कुठं होता बालेच्या प्रेमात !

पेरीनच्या नयनातलं आकर्षण तारुण्याच्या अभावित ऊर्मींतून निघा-लेली अननुभूति आहे अन् बालेचं प्रेम, त्यात भोळा भाव, पावित्र्य अन जिव्हाळा आहे असंच मी समजलों.

शिरीन म्हणजे हंसणारी अन् बागडणारी फुलपांखरी वृत्तीची अन् डेन म्हणजे गंभीर पण खेळकर. क्षणांत थांबत नि क्षणांत गंभीर होऊन सरासर नाचत नि ठुमकत जाणाऱ्या खारीसारखी मला भासे.

त्या दिवशी मी खोलींत आमचं कोणतंसं पुस्तक वाचीत बसलो होतों. तितक्यात 'अग शिरीन, अग शिरीन' करीत एक मुलगी एकदम खोलींतच शिरली. मी जरा घाबरलों. तिच्या माझ्या नेत्रकटाक्षात त्या डिबेटींगच्या आधीं अन् डिबेटींगच्या वादात झालेली खडाजंगीची चर्चा नमूद होती. मी तिला काहींतरी विचारणार अन् अशा अकस्मात् रितीनं तिचं येथं येण्याचं कारण विचारणार तोंच बाला आंत आली. बालेची अन् तिची भेट होताच कितीतरी वजन हलकं झाल्यासारखं वाटलं मला.

त्या दिवशी दद्दाला पदवी मिळाल्यानंतर शिरीनच्या नि दद्दाच्या संभाषणाची आठवण झाली मला.

बालेनं तिची नि माझी ओळख करून दिली. पण ती आपल्या उत्साही नयनांना माझ्यावर रोखीत म्हणाली, 'अग शिरीन त्यांची नि माझी ओळख परवाच झाली कॉलेजात. पण ती वादाच्या सुरवातीनं झाली नि आज ती वेगळ्याच रितीनं!'

मी मात्र काहींच बोललों नाही. जेव्हा असे काहीं प्रसंग निर्माण होत तेव्हां मी मौनता स्वीकारीत असें.

नंतर डेन, मी नि शिरीन खूपखूप बोलत होतो अन् ते इतक्या प्रमाणात कीं जणूं काय आम्ही सर्वचजण फारफार दिवसापासून एकमेकाशी परिचित आहोंत. तिनं ह्याच भेटींत शिरीनं माझ्या ठेवलेल्या 'जया' ह्या नावावर कोटी करून मला जिम् हे तिचं पुढच्या प्रेमाचं सांकेतिक नाव बहाल केलं होतं. तिचं घरगुती अन् पपाना आवडणारं नाव तिनं मला सागून टाकलं होतं.

———



मी पदवीधर झालों होतो. पण पुढें शिकण्याचा तो उत्साह नि कळकळ माझ्यांत शिल्लक राहिली नव्हती. माझं वेगवान आयुष्य एका वेगवान शक्तीकडे धाव घेत होतें. आता मीं कामगारांच्या प्रत्यक्ष लढ्यांत भाग घ्यायला सुरवात केली होती. पण मीं हें निर्माण केलेलं बाहेरचं वातावरण शिरीनला कळलं नाही अन् ते शेवटपर्यंत न कळविण्याचाच माझा विचार होता.

पण रावबहादुराना तें कळलं.

'जयंत कुठं केलंस हें एवढं भाषण अन् केव्हा मिळविलीस ही सामाजिक मान्यता तूं! मला तुझ्याबद्दल फार अभिमान वाटतो. पण तुला नुसतं पदवीधर होऊनच थांबायचं नाहीं. तुला अजून उच्च शिक्षण घ्यायचं आहे अन् मला पुढे सर्व कामांत मदत करायची आहे. त्याच दृष्टीनं तूं आपला आयुष्याचा कार्यक्रम आखावास असं मला वाटतं.'

मागच्या मिरत कटात आमचे कम्युनिस्ट पुढारी पकडले गेले होते. कामगारात असंतोष वाढला होता अन् त्याचा योग्य तो परिणाम व्हावा म्हणून आम्हीं सर्व शाळा कॉलेजें बंद पाडून दोन दिवस संप केला होता. माझं एका अथांग विद्यार्थ्यांच्या समूहापुढं भाषण झालं.

माझं रक्त सळसळून आलं होतं अन् एका हिरहिरीनं मी त्या अथांग विद्यार्थ्यांच्या समूहापुढें येऊन उभा राहिलों. जें मनाला येईल तें भकत सुटलों पण त्याचा निःशब्द सभेंत योग्य तो परिणाम झाला. माझं भाषण संपताच डेननं किती उत्साहानं हात दाबून माझं अभिनंदन केलं होतं तेव्हा!

× × ×

पण असे प्रसंग अन् तेहि इतके गोड मर्त्य मानवाच्या जीवनात क्वचितच येतात नि अढळ टिकतात.

त्याच सुमारास माझ्या प्रिय दद्दांना देवाज्ञा झाली हृदयविकारानं.

ज्या अंधारातून मीं प्रकाशाची याचना केली होती त्या प्रकाशानं मला प्रकाश दिला भवितव्याचा नि लोप केला स्थिर आकाशाचा.

मी पुन्हां पोरका झाल्याची जाणीव मला झाली.

शिरीनचं मीं शात्वन करावं अन् आम्हा दोघाचं पपा अन् डेननं करावं ह्यांतच काहीं दिवस निघून गेले.

पण दद्दा नसलेल्या त्या घरात मला रहावंसं वाटेना. मला ते भयाण वाटूं लागलं.

त्याच्या भाऊबंदानी नि शिरीनच्या सावत्र माणसानी त्या घरातल्या लोकांचा जाच करायला सुरवात केली. त्याचा पहिला प्रयोग माझ्यावर झाला.

मी निराळे राहण्याचा निर्णय ठरवून टाकला.

शिरीनला हे समजताच किती आसवं गाळली तिनं अन् किती प्रतिकार केला मला.

‘ जयंत तूंही मला सोडून जाणार ना ?’

‘ नाही. बाले, तूंही चल ना माझ्या बरोबर.

‘ पण हा आईचा जाच आहे ना रे माझ्यामागे !’

‘ शिरीन माझं घर तुला विश्रांतीची जागा होईल. जेव्हा तुला घर नकोसं वाटेल अन् आयुष्याचा वीट येईल, ह्या घरात रहाण्याचा कंटाळा येईल तेव्हा माझी आठवण ठेवशील ना शिरीन अन् आता दद्दाच्या मागे तुझ्या घरात कोणत्या वस्तूवर सत्ता राहिली आहे माझी बाला.’

मला आठवतं तिनं अशा काही चमत्कारिक हावभावानं माझा हात हातात घेतला अन् माझ्या अति उंचीची तिला जाणीव झाली म्हणूनच की काय मला हात धरून बसविले अन् बसल्यानंतर आपलं मुख माझ्या विशाल छातीवर ठेवून अन् पाठीला हाताचा विळखा घेत एखाद्या बालिके सारखं मुसमुसत म्हणाली,

‘ ह्या वस्तूवर तर आहे ना सत्ता तुझी जयंत ?’

‘ नाही. बाला ह्या वस्तूवर तर दुसऱ्याची सत्ता चालणार आहे कांहीं दिवसानीं.’ मी तिच्या अधरावरील माझे अधर विलग करीत म्हणालो.

ती माझ्याकडे केविलवाणें बघत नि माझ्या विशाल कपाळावरील केंस सारीत नि चुंबन घेत म्हणाली, ‘ जया, किती किती रे शिकलास तूं पण काय सांगूं...काहीच रे कसं कळत नाहीं जया. माझ्या सहवासांत राहिलास,

नानाप्रकारचे खेळ खेळलास, पण स्त्रियाच्या जीवनांत शिरून तिला उत्कट सुख लाभून देण्याची कला कांहीं केली नाहींस न हस्तगत! तूं त्या गोष्टीपासून दूर दूर राहिलास!'

तिच्यापासून विलग होताना तिन केलेलं हे गूढगुंजन, त्याचा साक्षात्कार मला नंतर त्या रात्रीं झाला.

× × ×

माझ्या स्वतंत्र जीवनाची रम्य प्रभात होती. एम्. ए. च्या अभ्यासाचा मी बी. ए. झाल्यानंतर एक वर्षानं सपाटा लावला होता. चळवळीत माझं अवधान होतं. डेनची मैत्री वाढतच होती. शिरीबालेचा जिव्हाळाहि पूर्ववत् कायम होता.

' बरोचा दिसायला जरा ठेंगणेच. अंगानं खूप सशक्त. चेहरा भारासूद. डोळयात नावीन्याची लकब—ती तरतरीत नासिका अन् त्या चकाकणाऱ्या कपोलावर अर्धवट तारुण्य निघून गेल्याची छटा. चेहऱ्यावर असमाधान नि त्यातच ती विलासी वृत्तीची झाक दिसल्यावाचून रहात नव्हती.

ते बोलताना अगोदर शातपणें संभाषणाला सुरवात करीत अन् मग विरोधक नच आवरेनासा झाला म्हणजे मोठ्यानं बोलून त्याला आपलं म्हणणं ऐकायला लावीत!

माझा त्याचा ह्या दिवसात बराच संबंध जडत चालला होता अन् त्यामुळे डेनची मैत्री वाढत चालली होती. मी पुष्कळदा तिच्या बरोबर फिरायला जाताना बालेनं बघितलं होतं. पण मी नि डेन असल्यावर जी संभाषणें आमचीं चालत असत त्यात बाला जर सामील झाली तर ती पार बदलून जात अन् तीं भलतीकडेच झुकत.

मला वाटतं ते कॉंग्रेस-मिनिस्ट्रीचे दिवस होते. प्रान्ताप्रान्तात कॉंग्रेसचा दरारा वाढूं लागला होता. जम बसत चालला होता. पण जनतेतलं प्रक्षुब्ध वातावरण काहीं निमालं नव्हतं. मजुराच्या न्याय्य मागण्याचे धिडवडे पहिल्यासारखेच निघत होते. विद्यार्थ्यांवर जुलूम पहिल्यासारखाच होत होता. पण शहराशहरांतला देखावा अन् आकर्षण वाढविण्याच्या कामात कॉंग्रेस-मंत्रिमंडळानं बराच वर नंबर पटकाविला होता. काय वाटतं ह्या

लोकाना, जनतेच्या ऐषारामात निरानिराळे **मोहपाश** तिच्या भोंवती जमा केले म्हणजे सुखानं राज्य करता येईल असंच ना ?

मजुरानी न्याय्य मागण्या पुढे केल्या होत्या अन् मंत्रिमंडळाला संपाचं आव्हान दिलं होतं.

एम्. ए. ची परीक्षा देऊन मी बसलो होतो अन् त्याच वेळेस 'ज्वाला' साप्ताहिकाचं संपादकत्व मी हातात घेतलं होतं.

साध्या पोषाखातच शिरीन आली. त्या दिवशी तिचा सत्ताविसावा वाढदिवस होता. किती साधा होता तो पोषाख ! तिचं ते नेसूं, गोल पाढरं पातळ न् आत काळा ब्लाऊझ, लाब सोडलेला शेपटा अन् खोवलेलं तें पिवळं फूल !

किती उत्साहानं आली होती ती त्या रात्री ! अन् किती अगत्यानं मला घेऊन गेली ती उदयशंकरच्या नाचासाठी !

'शिरीन, आज तूं फारच सुंदर दिसत आहेस.'

ती आपल्या मादक नयनात जास्तच मादकता साठवून म्हणाली, 'खरंच का रे मी सुंदर आहे जयंत ?'

'अं हं ! फारच वाईट दिसतेस तूं बाला. त्या संस्थानिकानं जर तुला आज बघितलं तर आपला बेत रद्दच करील बघ.'

'बरं बरं करूं दे. मला कशाला आली आहे त्याची पत्राज !'

'शिरीन, पण आज तूं डेनला नाही घेतलस बरोबर. तिच्या कॉलेज-मध्ये आहे आज गॅदरिंग !'

'पण कायरे जयंत, मी जवळ असल्यावर तिची आठवण कशी यावी तुला ?'

तिच्या मोटारींतून आम्ही उतरत अन् आत प्रवेश करीत योग्य जागीं बसताच तिनं माझा हात आपल्या हातात घेत प्रश्न केला, 'जया तूं डेनवर प्रेम करतो आहेस नाही !'

'तुला हे कसं कळलं ? मला तर कांहीं कळत नाहीं बुवा प्रेमबिम ! तिची मूक संमति मला कळते आम्ही दोघें तुझ्याबद्दल बोलत असतांना अन् तुझी वागणूक माझ्या नजरेला कळते आपण तिघंजण एकत्र असतांना.'

‘ जया, तूं भाग्यवान् आहेस. ती गोड मुलगी आहे. तिचं तुझं प्रेम असलं तर मला...’

मीं तिचा हात दाबीत म्हटलं, ‘बोल! बोलता बोलता थांबलीस का? तुला शंका का आली? समज, तूं म्हणतेस तसं माझं तिच्यावर प्रेम असल तर तुझ्याबद्दल ते कमी होईल अशी तर तुला शंका नाही ना आली बाला?’

किती समाधान नि आनंद झाला होता बालेला माझ्या त्या वाक्यानं अन् किती सळसळून हात दाबले तिनं आपल्या वक्षःस्थळापाशी नेऊन माझे!

नाच संपल्यानंतर परत येताना शिरीबाला म्हणाली, ‘ जया, शोफरला सांगितलंय मोटार घेऊन जायला. आता मी येईन तुझ्याच खोलीवर निजायला.’

शिरीबाला होती भलत्याच आनंदात. किती किती गप्पा मारीत होती ती चालता चालतां हसून. चंद्राचं पिठोरी चांदण पडलं होतं. रस्ता ओसाड ओसाड भासत होता अन् शिरीबाला न् मी त्या रस्त्यावर भविष्य काळातलं न कळणारं जीवन घेऊन हासत खिदळत चाललों होतो.

खोलीत आल्यावर मी प्रकाश केला. मी झोंपण्याच्या तयारींत होतों पण शिरीबाला नव्हती. तिच्या गप्पा जास्त जास्त रमत चालल्या होत्या. आपल्या सावत्र आईच्या नि आजीच्या गम्मती, छळवणूक, नात्यांतले सर्व संबंध, पप्पाचे नि त्याचे संबंध, डेनची नि तिची मैत्री, ह्या गोष्टी पुनः पुनः तिला सांगण्यात फारच मजा वाटत होती.

शेवटी तिचे दोन्ही हात माझ्या हातात धरीत नि तिच्यावर नजर रोखीत मी म्हणालों, ‘ बरं जा बरं त्या पलिकडच्या खोलींत नि झोंप आता. दोन वाजण्याची वेळ आली आहे. अन् हें बघ सकाळीं मला उठविण्याची नेहमीप्रमाणें घाई करूं नकोस. जा पाहूं.’

ती एखाद्या अज्ञान बालकाप्रमाणें, ‘ गेलें हं मी निघून झोपायला ’ असं म्हणून निघून गेली.

मी कॉटवर पडल्या पडल्या पुस्तकाच्या पानांची चाळवाचाळव केली. निजतांना पायथ्याकडल्या भल्या विस्तृत आरशाकडे बघितलं. माझ्या

चेहऱ्यावर निष्पाप बालकाची समाधानता झळकत होती. अर्ध्या हातानं मीं दिवा विझवला. निद्रादेवीच्या सांनिध्यानं समाधि लावली.

× × ×

मी जागा झालो कुणाच्या तरी मोहक स्पर्शानं. शिरीबालेनं त्या खोलींत निळा प्रकाश पाडला होता अन् माझ्याजवळ हंथरुणावर येऊन बसली होती.

'बाले झोंप नाही का येत तुला ?'

ती माझा चेहरा माडीवर घेत नि केसाची चाळवाचाळव करीत म्हणाली, 'जयंत, कुणाहि तरुणीला हेवा वाटेल अस तुझं व्यक्तित्व आहे रे !'

'शिरीबाला ह्या प्रशंसेचा अर्थ काय ?'

'जयत, माझा होशील का रे तूं ?'

'तुझाच तर आहे ना मी शिरीन.'

'अहं ! माझ्याजवळ असूनहि कितीतरी योजनं लाब आहेस तूं जयंत.'

रात्र शात होती. प्रकाश स्निग्ध होता. शिरीच्या तोडून असंदिग्ध वाक्याचा वर्षाव होत होता.

तिच्या माडीवर पडल्या-पडल्याच मी तिच्याकडे विनतमुख करून नि तिच्या पाठीवर हातानं थापटीत म्हटलं, 'कुणालाहि जें प्रेम कधी मिळणार नाही ते मी तुला दिलं आहे ना ?'

पण मी जरा चमकलो. तिच्या पाठीवरचा माझा हात तिच्या शरीराला–वस्त्रहीन शरीराला–स्पर्श करीत असल्याचा मला भास झाला. माझी दृष्टि समोर आरशात गेली. शिरीबालेच्या त्या नजरेला मी घाबरलो. त्या नजरेत निराळेच विकल भाव दिसत होते. बालेचे कॆस अस्ताव्यस्त झाले होते. तिचा उरोभाग विलगविलग नि स्पष्टपणें भाषा बोलत होता. कोणत्या तरी निश्चयाची छटा चमकूं लागली होती.

मी स्वतःला सांवरीत उठण्याचा प्रयत्न करूं लागलों. पण मी उठता उठताच बालेने माझा चेहरा आपल्या त्या आता भरीव दिसणाऱ्या अन् ठळकपणें तिचा बाणेदारपणा दाखविणाऱ्या उरोवलयावर मध्यभागीं दाबला ! इतक्या जोरानं की त्याच्या घर्षणानं माझ्या वृत्ति जागृत झाल्या.

तिच्या हृदयाच्या धडधडीत माझा श्वास मिसळूं लागला.

ती जास्त जास्त दाबत मला म्हणूं लागली, 'जया एकच इच्छा. तूं, 'मी तुझी आहे' म्हणतोस ना? मग भावनेच्या भाषेला कार्याचा विलंब का?'

माझ्या छातीत धडधड होऊं लागली. मनामध्ये विरोधी कालवा-कालव होऊं लागली. शिरीबालेनं अर्धनग्न स्थितीत अन् नवीनच न कळणाऱ्या संदेहानं मला दिलेलं ते आलिंगन!

तो एकच क्षण!

मोहाचा तो एकच क्षण!

माझ्या आश्रयदात्यानं माझ्यावर केलेल्या उपकारावर पाणी सोडण्याचा तो क्षण!

'शिरीन, तूं वेडी झाली आहेस!' मी केविलवाण्या स्वरांत म्हणालो.

'नाही रे जया, माझ्या ह्या घडीला अव्हेर करूं नकोस ना रे! स्त्रीचं अन् तेहि तरुण स्त्रीचं हृदय तुला कसं रे कळत नाही जया!' असं म्हणत तिनं मला पुन्हा घट्ट घट्ट आलिंगन दिलं. त्यात किती मादकता होती अन् किती विकारवशता होती त्या उष्ण श्वासात!

मी कांहीं तरी निश्चय केला. माझ्या कपाळावरची रेषा उभी राहिली. मी तिच्या आलिंगनातून मुक्त होत म्हटले,

'शिरीन, तुझ्यावर माझं प्रेम आहे—निःस्सीम आहे. ते असं घाणेरडं नि ओंगळ नाही.' मी तिला धरून नि अलमारीच्या समोरच्या आरशासमोर करीत नि निष्पाप नजर टाकीत तिला म्हटल, 'बाले, तूं माझी बहीण आहेस. काही नीतीची, सदभिरुचीची अन् पावित्र्याची जरा चाड ठेव. माझ्याकडून अस हिणकस कृत्य घडेल तरी कस बाले?'

हाय! हाय! मला वाटलं होतं मी तिला पटवून दिलेल्या ह्या समजुतीनं ती सावध होईल, हंसेल, अनुरागानं नि त्या पवित्र बंधनानं ती मला जवळ घेईल. ज्या पवित्र नात्यानं उभ्या जन्मांत मला एकाहि स्त्रीचा स्पर्श लाभला नव्हता, त्याचं भाग्य ती मला लाभूं देईल.

पण शिरीबाला रागावली. तिचे नयन खदिरागारासारखे लाल झाले.

तिचं पहिल्याच स्थितीतलं तें शरीर विकारवशतेमुळं जास्त जास्त कांपूं लागलं.

माझ्या अंगावर ती एखाद्या नागिणीप्रमाणें चवताळून आली. विद्युद्वेगाचा झटका बसल्याप्रमाणे माझी स्थिति झाली.

'नीति, सदभिरुचि नि पावित्र्य! तूंच म्हणत होतास ना, हे भाडवलदारांचे शब्द आहेत म्हणून. सभ्य लोकाना बुरख्याआड विलासी वृत्ति उडविण्याची वरची शाब्दिक बाजू आहे म्हणून! जयंत, तूं कृतघ्न आहेस. मधाची बाटली पुढे करून मध न देणारा तूं प्राणी आहेस. किती भोळ्या भावानं मी तुला माझं प्रेम अर्पण केलं होतं अन् किती उत्कटत्वानं मीं माझं सर्वस्व तुझ्या स्वाधीन करण्याचं ठरविलं होतं आज! शाब्दिक बोलाचे खेळ खेळून तूं त्या भाडवलदाराचीच भाषा वापरलीस शेवटीं! एखाद्या श्रीमंत तरुणाला मी भाळविलं असतं तर त्याच्याशी वाईट संबंध ठेऊनहि उघड्या मनान नि बेदरकार वृत्तीनं मी वागले असते उजळ माथ्यानं! पण तूं माझ्यावर मोहनी टाकलीस. सात वर्षे माझ्याशी प्रीतीचे खेळ खेळलास. हातात हात घालून नाचलास अन् ज्या प्रीतीची उत्कटता जींत आहे अशा बाबतींत झटकन नातेबदलीची मोहीम करून माझा शत्रु बनलास.' ती असह्यतेन रडूं लागली. मानेभोंवती तिनें हात घातला. माझ्या चेहऱ्यावर तिचे अश्रु टिपकूं लागले. तिच्या नग्न नि ऊन ऊन शरीराचे मला चटके बसूं लागले.

मी काहींही बोलण्याच्या स्थितींत नव्हतों. अकल्पित आघातामुळे मी लाचार बनलों होतो.

मी तिचं सर्व म्हणणं निलाजऱ्या मनानं ऐकत होतों. तिनं पुन्हा तीच प्रार्थना घोकली.

त्याला मीं तशीच असहाय्यता दाखविली.

मी संत्रस्त नि उदासपणें हातावर डोकं ठेऊन टेबलावर पडून राहिलों.

शिरीन बालेची निघून जाण्याची चाहूल मला लागली. दोनच मिनिटानी माझ्या विचाराची तंद्री उघडली. कोणल्या तरी बेभान विचारानं मी उठलों.

शिरीबाला, शिरीबाला अशा हाका मारीतच मी थोड्या अतरावरच्या चव्हाट्यावर पळत पळत आलो.

पण शिरीबालेची अस्पष्ट आकृति दूरदूर–हाकेच्या दूर–पळत असलेली दिसत होती.

चव्हाट्यावरल्या मधल्या गोल आकृतीच्या त्या लाल नि निळ्या दिव्यापाशी केसावरून हात फिरवीत तिला विमनस्क मनःस्थितींत विदारक आशेनं किती हाका मारल्या मी !

' शिरीबाला ! '

' शिरीबाला ! '

केव्हढ्यान हाका मारल्या मी त्या रात्रींच्या प्रगाढ शाततेत अन् केव्हढ्यानदा त्या हाका गरजल्या त्या रात्रीच्या प्रक्षुब्ध वातावरणात !

माझ्या विमनस्क झालेल्या विचारानं आकाशात मेघ दाटून आले. न कळणाऱ्या मार्गानं अन् डोळ्याना आलेल्या झापडीनं काळोख दाटून आला. शिरीबाला, शिरीबाला ह्या हाकेनं त्या मेघाच्या टकरा झाल्या. भोवतालच्या उंच उंच इमारतीवर पावसाचा वर्षाव होऊं लागला. माझ्या डोळ्यातून अश्रुसरी निघूं लागल्या. किती माझ्या निःष्पाप मनाच्या साथीदार होत्या त्या सरी नि ते अश्रु ?

शिरीबाला !

चेहरा अश्रूंनी भिजला होता नि शरीर पावसानं. अर्वाचीन भूत घटना डोळ्याभवतीं गरगर फिरत होत्या अन् समोरच्या मशिदीवरचा लाल दिवा पवित्र प्रेमभंगाची साक्ष पटवीत होता.

---

८

माझा एक मित्र म्हणत असतो 'स्मृति ही रबराच्या दोरीसारखी आहे. जितकी ती लाबत जाते तितकी ती लांब लाब होते अन् आपल्या गतायुष्याच्या आठवणीचा चित्रपट पुढे उभा करते.'

सिगारेटला सिगारेट शिलगावून नि धुराचे अजस्र लोट निर्माण करीत मी स्मृतीच्या रबरी दोरीला इतकं ताणीत ताणीत आणलं. पण शिरीबालेनं केलेल्या शेवटच्या प्रसंगानं ती पार तुटली. माझी स्मृतिसमाधि ढळली. मनाला हुरहूर लागली. काहीतरी हरविल्याची नि काहींतरी मिळ-ण्याची मनाला चुटपूट लागली. काहीतरी हरवणं नि ते मिळवण अन् जे मिळालं आहे ते हरवणं अन् त्या करता आयुष्याशी झुंज खेळणं हीच मानवाच्या जीवनाची इतिकर्तव्यता.

मनाच्या ह्या संत्रस्त स्थितीतच मी संपादकीय कचेरीत पाऊल टाकलं मणिबेन काहीतरी लिहीत होती अन् जीवनकुमार टाईप करण्यात गढून गेला होता.

मी आतल्या पार्टिशनमध्ये जाऊन बसलो. कागदाशी उगाच काही तरी चाळा करीत होतो मी. पण मनाला मात्र उदास उदास वाटत होतं. मणिबेन आत आली. 'भाई हाटे, तुमच्याकडे एक मुलगी–परवां नाही का तिनं कॉलेजमध्यें स्टंट केला ती....... येऊन गेली. ती बसली होती तुमची वाट पहात. पण आज तुम्ही उशीरा आलात. ती निघून गेली.'

ज्या गोष्टी नको आहेत त्या पुढें आल्या म्हणजे मनाला ज्या वेदना होतात त्या वेदनेनं भारावून मी कपाळावर आठ्या आणीत नि जरा त्रासिक मुद्रेनंच बेनला म्हटलं, 'काय काम होतं तिचं माझ्याशी ? अन् हें बघा कार्यकर्त्यांना आपल्या गटात घेताना जरा त्याची चाचणी घेत जा. काहीं काही तरुण नि तरुणी भावनेच्या आहारी जाऊन राष्ट्रीय कार्याच्या विकृत कल्पना मनाशी बाळगतात अन् मग तो भावनेचा भर ओसरला म्हणजे एक तर ते दूर सरकतात नाही तर कार्यनाशास उद्युक्त होतात. राजकारण म्हणजे काही भावनेची खिचडी नाही. तिथं बुद्धीची शिदोरी घेऊन जो येईल त्यालाच ती जाणीव प्रखर होईल.'

माझ्या बोलण्यावर मणीबेन नेहमीसारखंच गालातल्या गालांत मंद स्मित करीत म्हणाली, 'भाई माझ्या ती चागली परिचयाची आहे.'

' बरं तर भेटेन मी त्याना केव्हा तरी. पण तुम्हींच ठेवा त्यांच्याशीं संबंध तसा.'

त्यानन्तर जीवनकुमार कांहीसा पिवळा कागद घेऊन आला.

' हाटे, आतापासूनच सरकारच्या दडपादडपीला कशी सुरवात झाली आहे ती बघा.' तो कागद पुढे करीत तो म्हणाला, ' सेन्सारच्या नियमानुसार जो कोणी युद्धविरोधी हालचाल करील, बातम्या उठवील किंवा छापेल त्यास 'प्रेस ॲक्ट' खाली शिक्षा करण्यात येईल. हाटे, हे नियंत्रण आता असंच वाढणार आहे. रशियान फिन्लडवर आक्रमण करण्याचा घाट घातला आहे. जनता चिडून गेली आहे. जगातल्या ठिकठिकाणच्या साम्यवादी वर्तुळावर रशिया सध्या मैत्रीचा हात ठेऊन त्याना आपल्यात मिसळून घेत आहे. पण ब्रिटनने आता फिन्लडला अंतर्गत उठावणी दिली आहे आणि उघडपणे रशियाचा प्रतिकार करायला जाग केलं आहे. १९३३ मध्ये फिन्लंडच्या साम्यवादी गटानं अराजकता माजवून राज्याची धूळधाण करण्याचा घाट घातला होता. पण त्याहि वेळेस ब्रिटननेच त्याना आतून साह्य केलं अन् पार्लमेटरी बोर्ड पुन्हा स्थापन केलं. जनतेत ह्या प्रश्नावर फार चर्चा होऊन राहिली आहे. ती ह्याकडे निरनिराळ्या दृष्टीने बघत आहे. अन् मला वाटतं ह्यावर योग्य ती दृष्टि टाकून अन् फिन्लड नि रशियाचं युद्ध ह्याकडे तात्त्विक नि बौद्धिक दृष्टीनं लोकाची नजर जावी असा आपण पुढचा अंक काढूं या !'

' पण आपण अशा जहाल प्रश्नावर आजपासूनच चर्चा करूं लागलो तर मला नाहीं वाटत आपल साप्ताहिक युद्धोत्तर काळात टिकाव धरीलसे !' मणीबेन मध्येच म्हणाली.

सिगरेटचे झुरके अंतराळात गडप करीत मी म्हणालों, ' काय बोलता हे तुम्ही. आता तर वेळ आहे आपल्या कलात्मकतेची !'

जीवन जरासा हंसला नि म्हणाला, ' खरंच हाटे, तुमच्या इतका रोमॅन्टिक क्रान्तिकारक मी बघितला नाही. युद्ध चालू आहे–जग विनाशवंत आहे–हिंदी स्वातंत्र्य गोंधळात आहे. तुम्ही मात्र कला नि आत्मा ह्याची सागड घालून राजकारण खेळण्याची भाषा बोलत आहात !'

जीवनकुमारनी माझ्यावर मारलेले शेरे ! मला त्याचं काहींच वाटलं

नाहीं त्या वेळेस.

मी गंभीरपणानें त्याला म्हणालों, 'कलात्मकतेची भाषा तुम्हांला कळली नाही माझी ! ती म्हणजे अशी कीं, विरोधी सत्तेवर दुगाण्या झाडून समाजात जी वैचारिक क्रान्तीची वाट भाषेंतून व्यक्त होते तिला म्हणतों मी कलात्मकता. कलात्मकतेचा आपल्या नेहमीच्या रूढीप्रमाणे अर्थ लावलात ना तुम्ही जीवनकुमार !'

लागलीच मणीबेन माझ्या शब्दाचा आधार घेऊन म्हणाली, 'हो साम्राज्यशाहीचा निषेध नि लोकात जागृति अशा शब्दात जाहीर करावयाची की ज्यानी विरोधी सत्तेला तर गुदगुल्या होतील अन् लोकाना मात्र खऱ्या खऱ्या पडद्याआडच्या वस्तु दिसतील.'

मी चहाचा कप उचलीत अन् त्याना घेण्याला खुणावीत म्हणालों, 'अगदीं असाच ना आशय होता माझ्या म्हणण्याचा ?'

× × ×

जीवन नि बेन बहुतेक गेल्या असाव्यात. मी पेन तोंडाला लाऊन अन् गरगर फिरणाऱ्या पंख्यावर दृष्टि स्थिर करीत विचार करूं लागलों.

युद्ध सुरू झाल्यापासून जीवननं नि अजितनं जहाल जहाल लेख लिहिण्याचा सपाटा लावला आहे अगदी. अन् असंच जर चाललं तर आमचं हें इंग्रजी साप्ताहिक पुढं चालणं काठिणच. पुरुषोत्तम श्रॉफनीं मागें एकदा शातपणें म्हटलं होतं, 'तुम्ही आपल्या साप्ताहिकाचं धोरण चार बुद्धिजीवी लोकाना नि राजकारणी मुत्सद्यांना साजेसं न ठेवता अखिल जनतेला विश्वासात ठेवण्याजोगं ठेवा. त्यात निरानिराळे सदर घालून त्यांची करमणूक करा अन् त्यातूनच......' पण त्याची ती सल्ला मला पटली नाही अन् आमच्या गटातल्या त्या उसळत्या रक्ताच्या तरुणांना तर ती मुळींच सम्मत नव्हती.

अजित मागच्याच महिन्यांतून बंगालमधून दौरा काढून आला होता. त्याची ती उंची, शरीराची जाडी, गौर बर्ण अन् चेहऱ्यावर असलेले देवीचे डाग, घारे घारे डोळे ! त्याची लिहिण्याची नि प्रवासाची खूप खूप भटकी वृत्ति ! बस्स हीच त्याची हौस.

त्याला मीं म्हटलं होतं, 'अजित, आपल्या साप्ताहिकाचं हें धोरण

चांगलं नाहीं. काय फायदा आपण असं लिहून! अन् तें लिहिल्यानंतर आक्षेपार्ह ठरेल, साप्ताहिक बन्द पडेल अन् चार भिंतींच्या आंत रवानगी होईल!'

तो धीटपणानं टेबलावर बुक्की ठोकीत म्हणाला, 'जयंत, ते काही नाहीं. चालू आहे असंच चाललं पाहिजे. आपल्याला वर्गणीदार काही कमी नाहींत. बंगाल नि बिहार प्रान्तात मी कितीतरी वर्गणीदार मिळवले आहेत. आपलं साप्ताहिक सर्वांना प्रिय आहे. अन् तूं म्हणतोस तशी वेळ आलीच तर तसंच दुसरं निराळं काही तरी करून प्रचारकार्य करायला काय कार्यकर्त्यांची वाण आहे?'

असे विचार चालले अन् मी पुन्हा कागदावर लेखणी घांसण्यात गर्क होऊन गेलो.

'ओहो, संपादक महाशय! नमस्कार!'

मी तंद्रीतून मान वर केली अन् वर बघितलं. पाहतो तों काय? असावरी!

'अरे वा! कुणीकडे? या. बसा ना.' मी तोंडातली सिगारेट काढून अन् त्याच हातानं खुर्चीकडे तिला बसण्याचा इशारा करीत म्हणालो. 'किती तरी दिवसानी आपण आज भेटत आहोत नाही?' बसता बसता तिनं उद्गार काढले.

तिच्या त्या येण्यानं मी फारच भाबावून गेलो. मिनिटामिनिटानं गाडी येणाऱ्या स्टेशनसारखी माझ्या मनाची स्थिति झाली.

डेनचं येणं नि तिची वागणूक. त्यातून शिरीबालेची आठवण नि ती बुझत चालली तोंच असावरीची अप्रस्तुत हाजरी!

मी काहीशा निश्चयानंच तिच्याकडे बघितलं. पण तिचा आजचा पोषाख रमणीय होता. ती गुलाबी झाक मारणारं तलम गोल पातळ नेसली होती. अंगात तिनं पाढऱ्या सिल्कचा शर्ट घातला होता. त्याच्या अस्तन्या मनगटावर घट्ट बसल्या होत्या. गळ्यावरची विशाल पोलो कॉलर गौर मानेशीं स्पर्धा करीत होती. तिच्या वदनावर गुलाबी हास्य ओसंडत होतं अन् त्या धुंद धुंद नयनातून ते जास्त ओसंडावं म्हणूनच कीं काय गालावरील हाडावरचा टचटचीत मांसल भाग चकाकून कुणा-

च्याहि डोळयात भरत होता. अन् तिच्या गोड जिवणीखालील हनुवटीवर तिच्या सौंदर्याला गालबोट म्हणूनच कीं काय निसर्गानं तेथे काळा तीळ रोवून दिला होता. अशा रितीनं बघताच अन् तिच्या कपाळावर आलेले घर्मबिंदु अन् त्यावर प्रेमळपणानं रुळणाऱ्या केसाच्या बटा पाहून, तिच्याशीं बेरोख वागण्याचा माझा निश्चय कुठंतरी मावळला अन् माझ्या तोंडून अभावितपणें उद्गार निघाले, ' हं कसं काय येणं केलं आज तुम्ही इकडे !'

ती, कपाळावर आलेल्या मोहक बटा बाजूला सारीत सारीत म्हणाली, ' त्याचं असं झालं, त्या दिवसापासून तुम्हाला भेटण्याची कितीदा तरी इच्छा झाली मला. पण इतर कामामुळं मी येऊच शकले नाही तुमच्याकडे !...'

' पण हळूहळू मला कळूं लागलं की माझे सर्व मित्र नि मैत्रिणी तुमच्या ओळखीच्या नि नेहमी तुम्हाला भेटणाऱ्या आहेत. अन् मी मात्र तुमची त्या दिवशी तशा परिस्थितीत ओळख झाली असताना तुमच्या पासून दूर अन् हे दूरदूर राहणं मला बरं वाटेना म्हणून...'

मी सिगारेट शिलगावीत म्हणालो, ' हो, तुम्ही त्या दिवशी विद्या-र्थ्यांच्या संपात बराच भाग घेतला म्हणे. मला फार आनंद झाला त्याबद्दल. तुम्ही योग्य तेच केलं आणि असंच पुढं कराल अशी मला खात्री वाटत आहे. '

' हो, पण जयंत, मी मुद्दाम आले होते तुमच्याकडे अन् ते ह्या करता कीं येत्या शनिवारी आमच्या येथे एका प्रख्यात गवयाचं गाणं आहे अन त्या करतां तुम्हांला आमंत्रण देण्याकरिता मी मुद्दाम आले आहे. माझ्या वडिलांना गाण्याचा भारी नाद आहे. तो इतका की त्यानीं त्यावरील अमूप भक्तीनंच तर माझं नाव ' असावरी ' ठेवलं आहे. माझ्या वडील भावाचं नांव आहे भैरव अन् धाकट्या बहिणीचं नाव आहे बागेश्री ! तुम्ही त्या दिवशी किती सुंदर नाचलांत. मला कल्पना नव्हती तशी. मी बाबाना सागितलं सुद्धा. किती आनंद झाला त्यांना ! किती आग्रहानं बोलावलं आहे तुम्हाला त्यानी !'

माझ्या मनात कालवाकालव सुरू झाली. ह्या मुलीनं तर आघाडी मारली. आणखी कोणाला सागितलं असेल अन् काय घोटाळा केला असेल ? माझ्या सहकाऱ्याना जर ह्या गोष्टी कळल्या तर किती अनादर

माजेल माझ्याबद्दल त्याच्या मनात. आताच जीवनकुमारनं शेरा मारला होता ना कीं 'जयंत हाटे, तुम्ही रोमॅन्टिक क्रान्तिकारक अहात म्हणून!'

मी चेहऱ्यावर गंभीर छटा आणीत म्हणालो, 'हे बघा मिस् असावरी, मला गाण्याची मुळीच आवड नाहीं अन् कोणत्या गाण्याच्या बैठकीत मी गेलों कीं मला धडकी भरते ते ऐकण्याची! मला वाटतं मी कांही तुमच्या ह्या आमंत्रणाचा स्वीकार करूं शकणार नाही अन् मला वेळहि नाहीं तितका.'

आम्ही दोघं बराच वेळ स्तब्ध होतों. तिला असं सागण्यावाचून मला दुसरा इलाज नव्हता.

ती मलूल चेहऱ्यानं अधोमुख होत बोलूं लागली, 'जयंत, किती उत्साहाने आले होतें बोलवायला तुम्हाला. तुमच्या राजकीय अन् सामाजिक स्थानाची, कल्पनाची योग्य ती जाणीव ठेऊन आलेहि नसते तुमच्याकडे मी. तुम्ही किती उंच अहात. मी किती खोल. पण तुम्ही त्या रात्रीं किती सहजपणे त्या नाचाचं आव्हान स्वीकारलं! किती ते रम्य क्षण! काय त्या वेळेची काहींच का किमत नाही जयंत? माझ्या मतात नि विचारात किती पालट केला त्या क्षणानी अन् किती उंच उंच रस्ता दाखविला मला तुमच्या त्या स्पर्शानं.'

केव्हढ्या धीटपणानं नि सहजपणे बोलून गेली ती! मी जास्तच पेचात पडलो. मला काहीच सुचेना. मी बोटाचा व्यर्थ चाळा करूं लागलो. केसाना उगीचच मागेपुढे करूं लागलों.

शेवटीं ती म्हणाली, 'मग काय? येणार ना तुम्ही.'

तिची ती अति व्याकुलता बघून अन् तिच्याकडे न पाहिल्यासारखं करून मी म्हणालों, 'बरं येईन. पण एका अटीवर.'

लागलीच तिच्या चेहऱ्यावर काय पण गोड हास्य आलं! ती त्या रुंद टेबलावर, माझ्यासमोर टेबलाच्या कडेला छातीचा दाब देत नि माझ्याकडे वाकत म्हणाली, 'तुमची कोणतीहि अट मला मान्य आहे.'

मी तुमच्याकडे येईन. पण थोडा वेळ बसून परत फिरेन. पण कुणाला सागायचं नाही मी आलों होतो म्हणून.'

ती निघून गेली. आपला हट्ट पणास लाऊन ती निघून गेली. माझं

मन त्रस्त त्रस्त झालं. मीं सिगारेट शिलगावली. धूर सोडूं लागलों. उभा राहिलों नि बसलो. पुन्हा त्या पार्टिशनमध्यें आतल्या आत येरझारा घालूं लागलो. पुन:पुन्हा तेच ते विचार येऊं लागले. शिरीबाला, डेन नि ही नवीन असावरी. कशाला येतात ह्या मुली माझ्या आयुष्यात अन् कां त्रस्त करतात मनाला माझ्या. मी माझ्या मनावर शाततेचा ताबा मिळवूं शकलों नाही. कुणापाशी उघडं करून बोलेन तर ते शक्य नाही. किती कोदट नि कुंद वातावरण झालं होतं माझ्या मनात! मी कातडी बॅग घेऊन जायला निघालो. संध्याकाळच्या एका अभ्यासमंडळाच नेतृत्व माझ्याकडे होतं. मला वाटलं माझ्या मनाला तेथे विश्रान्ति मिळेल.

मी बाहेर पडलो.

रात्री परत येताना मी एका हॉटेलमध्यें चहा घेत होतों. संध्याकाळच्या एका पत्रात फिन्लंडवर रशियानं आक्रमण केल्याची बातमी ठळक ठशात छापली गेली होती.

आणि त्याच विषयावर माझ्यापासून काहीसे दूर असलेल्या चहाचकाट्या मारणाऱ्या कंपूतून काही संवाद माझ्या कानावर आदळूं लागले.

'शेवटी स्टॅलिननं हिटलरच्याहि पुढे आघाडी मारली. एक राष्ट्र ताब्यात घेण्यात तर मला वाटतं हिटलर, स्टॅलिन अन् तो सध्या गुपचुप बसलेला मुसोलिनी जोपर्यंत आहेत तोपर्यंत जगात शातता लाभणार नाही!'

वा! स्टॅलिनला तुम्ही हुकूमशहा ठरविता! आपला फायदा न पाहता जनतेच्या संरक्षणासाठी राष्ट्र ताब्यात घेऊन सोव्हिएट सत्ता स्थापणं म्हणजे कांही हुकूमशाही गाजवणं नाहीं!'

'हे बघा पंत, ती लोकशाही नि स्वातंत्र्य सर्व झूट आहे. जोंपर्यंत जनता आहे तोपर्यंत सत्ताधारी कोणीतरी असणारच. स्टॅलिन रशियाचा आवाज आहे अन् आपले गाधी कॉंग्रेसचा आवाज आहेत. एकून काय तर दोघाच्या आदेशावर दोन्ही जनताचं भवितव्य अवलंबून आहे.'

'छे! राव कुठं गाधी अन् कुठं स्टॅलिन! राष्ट्र एखाद्या व्यक्तीला मोठेपणा देते ते त्याच्या त्यागाच्या, शौर्याच्या नि आणिबाणीच्या वेळेस राष्ट्राला परकीयापासून वाचविल्याबद्दल देतं किवा तसा प्रयत्न करूं लागणाऱ्या गुणाला महत्त्व देतें. लेनिननं रशियन जनतेला मार्ग दाखविला. स्टॅलिन

त्याचा वाटाड्या बनला. त्यानं सारी जोखीम आपल्या अंगावर घेतली म्हणजे काही हुकुमशाही नाही. गाधीजी काय करीत आहेत? अहिंसेची नशा पाजून हिसात्मक प्रवृत्ति दाबून टाकून इंग्लिश ज्ञानानं अधिकच कमकुवत झालेल्या जनतेला जास्त प्रतिकाररहित करीत आहेत! आजच्या जगात हुकुमशाहीची व्याख्या म्हणजे केवळ 'आपल्या राक्षसी महत्त्वाकाक्षेन प्रेरित होऊन आपल्या राष्ट्राची सर्व शक्ति दुसऱ्या राष्ट्राची राखरागोळी करण्याकरिता खर्च करणे' अशी आहे.'

तितक्यात खादीचा पेहराव घातलेला नि डोक्याला टोपी नसलेला गृहस्थ पुढे सरकला अन् त्या तिघा चौघाना म्हणाला, 'बघा जर्मनीची विमानं इंग्लडवर घिरट्या घालूं लागली आहेत अन् क्वचित् ठिकाणी स्फोट करण्यात आल्याचे समजते. हा सुरू झालेल्या युद्धाचा विध्वंसक शेवट आहे. जगावर कधीही न मावळणाऱ्या सूर्याचा हा आकस्मिक लोप होण्याचा इशारा आहे. रशियान लहान लहान राष्ट्रे ताब्यात घेतली तीं आपली ताकद वाढविण्याकरिता अन् हिटलर दुसऱ्या राष्ट्रावर आक्रमण करतो ते त्या त्या राष्ट्राना दुर्बल नि रक्तविहीन करण्याकरता! अशा ह्या दुहेरी युद्धाची मला मजा वाटते. पण ह्याचा शेवट जागतिक वर्गयुद्धातच होईल. आज हिटलर नि स्टॅलिन हातात हात घालून हंसत आहेत पण उद्या अशी वेळ येईल कीं ह्या प्रबळ असणाऱ्या समाजसत्तावादी सोव्हिएटवर तोच हिटलर शत्रुत्वानं नि राक्षसीपणे चाल करून जाईल! अगोदर हिटलरला मारण्याकरता सर्व राष्ट्रे एकमत होतील अन् मग त्यातूनच भवितव्य सुंदर बनविणारं ते वर्गयुद्ध पेटल्याशिवाय रहाणार नाही!'

'हें बघा मिस्टर, अस जर झालं तर आम्ही मग सपशेल कबूल करूं की, स्टॅलिन हुकूमशहा नाही म्हणून!'

एक साधारण पोक्तसा गृहस्थ त्या तिघा चौघावर एकदम गर्जला, 'तुम्ही हा बाष्कळ वाद बंद करा बघूं. मी म्हणतो, प्रत्येक पुरुष हा हुकूमशहा आहे! करायच आहे काय ह्या गोष्टीचा निकष लावून आपल्याला? लष्करभरती होत आहे होऊं द्या. सरकार पैसे मागत आहे—द्या. सिव्हिक गार्ड्सची योजना अंमलात आली येऊं द्या. नाहीतरी फुकट फौजदारी करायला आम्हाला मग मिळणार कशी? शहरात रात्रीं अंधार करण्यात

आला आहे–आम्ही अंधारात राहूं. हवाई हल्याच्या तालमी सुरू झाल्या आहेत–आम्ही नियम पाळूं. अहो आज ब्रिटीश आहेत, उद्या जर्मन येतील, एकूण काय आमच्या मागचा हा जीवनकलह सुटणार आहे काय ? चला चहा घ्या नि बाहेर पडा. माझं डोकं कसं सुन्न झालं आहे. चलता का कुठं सिनेमाला ? घरी गेल की तो सोन्या–गोपी–बेबी... . '

ते उठले पण त्या खादीचा पेहराव घातलेल्या गृहस्थाचा चेहरा जरा त्रासिकच दिसत होता. त्यानीं केलेलं युद्धाच भाष्य ऐकून मला त्याच्या ओळखीबद्दल जिज्ञासा वाटू लागली. त्याला ह्या खुशालचेंडूचा सहवास कटाळवाणा झाला असावा. कारण तो त्याना जरा त्रासिकपणेच पण डोळ्यात उसनी चकाकी आणून नि नमस्ते करून बाहेर पडण्याच्या बेतात होता.

उरलेला चहा तसाच गिळून काउन्टरपाशीं आलो. सिगारेट शिलगावली. पैसे दिले नि बॅग हातात घेऊन त्या गृहस्थाला गाठीत म्हटलं 'मिस्टर आपलं नाव कळेल का मला ? '

तो बराच गागरला. त्याच्या त्या तरुण, चकाकणाऱ्या चेहऱ्यावर भेदरटपणाची छटा चमकली. पण तो धीटपणानं म्हणाला, 'हो, माझं नाव विश्वास दाते. नेपच्युन इन्शुअरन्स कंपनीत मी नोकरीला आहे. आपण कोण नि आपलं काय काम माझ्याशी ? '

मी माझं नाव सांगितलं नि त्याला मला भेटायला सूचना केली. सर्व ऐकून घेतल्यावर त्याचा तो भेदरटपणा कुठल्याकुठ पळून गेला. तो मनमोकळेपणानं बोलूं लागला अन् भेटण्याची कबुली देऊन निघून गेला.

मी खाली उतरलो. एक मोटर जोरात माझ्या पावलाना चाटून निघून गेली.

काय जीवनाकरता कंटाळलेल्या नि काही करायचं असूनहि न करतां येणाऱ्या ह्या लोकाना ती क्रान्तीची जादू फिरविता येणार नाही ? असा प्रश्न त्या जलद जाणाऱ्या मोटारीप्रमाणें माझ्या मनात चमकून गेला.

# १

सतीशचा रोजचा नियम होता.

रोज संध्याकाळी सात वाजल्यापासून दहा वाजेपर्यंत तो युनिअनच्या ऑफिसमध्यें बसत असे. जुन्या कार्यकर्त्यांच्या भेटी, नवीन कार्यकर्त्यांच्या ओळखी अन् कामाचा आढावा काढणं नि प्राताप्रातात होत असणाऱ्या आन्दोलनाचं सूक्ष्म अवलोकन करणं नि त्याना काही इशारा करून ठेवणं ह्या त्याचा नित्य उपक्रम असे.

आजहि मी नित्याप्रमाणे तिथं त्याना भेटायला गेलो होतो. तोंच सतीश माझी वाट पहात असलेला मला तिथं दिसला. सतीशला ओळखणं कधींच कुणाला जड पडत नसे. त्याचा सुकून गेलेला चेहेरा, खोल गेलेले गाल अन् वर आलेली हाडे अन् वर वाऱ्यानं भुरभुर उडणारे केस. अंगात नेहमी नेहरू शर्ट, त्यावर जाकीट अन् खाली पायघोळ पायजमा ह्या त्याचा नित्याचा पेहराव. त्याचे लालजर्द ओठ अन् त्याला साजेसे मिणमिण करणाऱ्या पंतीसारखे त्याचे ते डोळे अन् अशी त्याची शरीर-प्रकृति होण्याचे कारण एकच. त्याची अति कळकळीनं नि चंचलतेनं काम करण्याची वृत्ति. मी कॉलेजमध्यें असल्यापासून माझी नि त्याची तो एक प्रख्यात कम्युनिस्ट पुढारी म्हणून चागली ओळख होती. एका प्रभावशाली युनिअनचा तो एक सूत्रधार होता.

विभास वर्दे! उंच नि काटकुळा. चेहऱ्यानं कुणाच्याहि डोळयात न भरणारा. हाडावर नेहमीं चष्मा लावणारा. पण त्याच ते टक्कल अन् त्याच्या भोवताली भुरभुर करणारे केस पाहून मला साम्राज्यशाहीच्या तळयाभोंवती लोकशाहीचं दिमाखानं प्रतिबिंब पाहणाऱ्या रोपट्याप्रमाणे भासत. हंसताना त्याचे दात चमकत असत अन् डोळे किंचितूसे विस्तारले जात असत. त्याच्या नेहमी असणाऱ्या तिरंगी सुटानं नि एकसारख्या बोलभांडपणानं तो आपल्या युनिअनच्या कामकाजाची अन् हिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेल्या त्याच्या शाखाची फारच शिताफीन कामगिरी बजावीत असे.

रूपमती अय्यर! ती ठेंगणीशी, जाडजूड, गोल अन् अरुंद चेह-ऱ्याची, नाकाला लहानसा चष्मा लावणारी स्त्री! इतकं असूनहि डोळयांत

चकाकी—कार्यात अबोल चपलता हा तिचा प्रमुख गुण मला आवडत असे! अन् म्हणूनच जेव्हा सतीशला मी म्हणे, ‘ कायरे सतीश, तूं नेहमी म्हणतोस ना ? लठ्ठ अन् खुजी माणसं विश्वासहीन असतात म्हणून अन् म्हणून तूं होता होईल तो त्याना आपल्या खाजगी मंडळात न येऊं देण्याची खबरदारी घेतोस. तर मग रूपमतीबद्दल असं का ?’

तो त्याला हंसत उत्तर देत असे, ‘ अरे बाबा नियमाला अपवाद असतो ना. ’

आता राहता राहिला प्रदीप माळाणी. तो १९२७ च्या राजकीय चळवळीपासून एकसारखा कारावास भोगीत भोगीत आमच्या चळवळीपर्यंत येऊन ठेपला होता. पुण्याला तो पदवीधर झाला. त्याचं राजकारणात फार मोठं स्थान होत. सतीश अन् प्रदीप दोघानी मिरत खटल्यात यातना भोगल्या होत्या, पण प्रदीपने आपणाला सतीशसारखे निव्वळ राजकारणाला वाहून घेतले नव्हते की वर्देसारखे तीनशे रुपयावर लाथ मारून राजकारण हेच आपल अंतिम ध्येय असं मानले नव्हते! तो शिक्षक होता अन् विवाहित असूनहि त्याची आपल्या पदवीधर पत्नीला सोडून कारागृहात जाण्याची तयारी होती. तो अविरत कार्य करीत असे पण अगदीं शात अन् धिम्मेपणानं! मी त्याला नेहमी म्हणत असे, ‘ प्रदीप हिंसेचे जंतु अजून तुझ्यातून पार गेले नाहीत रे!’ नतर तो उलट म्हणत असे, ‘ जयंत, तुम्ही सर्व तरुण भारी उतावीळ आहात. भाषण करायला उठता तेव्हा जणुं काय विरोधी सत्तेवर तुटून पडता अगदी. अरे आपल्याला जे सागायचं आहे तें जनतेला तर कळूं दिलं पाहिजे ना ?’ अन् खरंच तो एकाहि सभेत बोलल्याशिवाय रहात नसे. अन् तो बोलूं लागला की संगीताच्या आरोह अन् अवरोहाची मला आठवण होत असे. मजुराच्या टाळ्याच्या कडकडाटात तो मायक्रोफोन समारून परतत असे.

मी येताच सतीश म्हणाला, ‘ जयंत, अरे अजीत आला आहे इथं. पण मला कसा अजून भेटला नाही ? पण काय रे जयंत, त्यानं तिकडील काहीं परिस्थिति सागितली आहे का तुला ?’

‘ म्हणजे ? काही भिण्यासारखं आहे कीं काय ? सतीश, तसं असतं तर त्यानं मला सांगितलं असतं पण त्यानं आपल्या साप्ताहिकाबद्दल सागि-

तलं मात्र बरंच.'

'अस्सं का! बरं ते असूं दे. मला वाटतं परवा रात्री आपण बैठक ठरवूं या अन् आपला पुढचा कार्यक्रम आखू या. कारण कॉंग्रेस अजून काही करायला तयार नाही.'

व्हाइसरायची अन् कॉंग्रेस पुढाऱ्याची नुसती खिचमखेच चालली आहे असेंब्लीत, जशी कचकड्याच्या माळेची ओढाताण चालावी तशी अन् मला असं वाटतं ही लाबण अशीच रामगढ कॉंग्रेसपर्यंत वाढत जाईल अन् मग तेथेंहि सर्व गांधीच्या हातात. पण जयत त्याच वेळेस आपण मागे ठरविल्याप्रमाणे जर केलं तर! अन् एक आन्दोलन माजविलं पाहिजे म्हणजे मला वाटतं त्याला एक निराळीच दिशा लागेल.'

'हो ठरवूं या आपण. पण मग आपण सर्व जमायचं कुठं?'

सतीश कपाळवरच्या आठ्यावर हात चोळीत म्हणाला, 'हो जागेचाहि प्रश्न आहेच नाहीं का? बर तो चौगुले आहे ना, त्याच्या घरी. शिवाजी पार्कपाशी राहतो तो. त्याला सागतो मी व्यवस्था करायला अन् बघ दोनतीन विद्यार्थी-प्रतिनिधींनाहि आण तिथं.'

सिगारेटचा धूर सोडीत मी म्हणालो, 'बर मग परवा रात्री नऊ वाजता. नक्की हं.'

'हो अगदी नक्की.'

सतीशची ती बसायची जागा विलक्षण विचित्र होती. तो बसत होता त्या जागेवर मागच्या बाजूला एक उच खिडकी होती. खिडकीचा खालचा भाग सदा लागलेला असे. पण वरचा भाग उघडा असे. एक मोडकं टेबल अन् त्याच्यापुढे एक तुटका बेंच सदोदित पडलेला असे अन् उजव्या बाजूच्या मोरींतून सतत वाहणारी नळाच्या पाण्याची धार, सतत राजकारण धावण्याची साक्ष पटवीत असे. त्याच्यापुढे पार्टिशनचा तख्ता असून त्याला भेटायला आलेल्या व्यक्तींना, त्याच्याशी जे कोणी बोलत असत त्याच बोलणं संपतं केव्हा अन् आपण जाऊन बोलतो केव्हा अशी आतुरता वाटत असे. ही खोली लहान होती. पण तींतच बाहेरच्या विश्वव्यापक आन्दोलनाचे धागेदोरे ओढण्याची अन् सोडण्याची जिज्ञासा होती. पुढच्या अमर्याद काळाची ती रम्य कल्पना! पण त्या करितां

अविरत कार्य व श्रम करण्याची नि दुःख सोसण्याची ती एक प्रयोगशाळा होती.

त्या उघड्या खिडकीतून समोर दिसणाऱ्या इमारती अन् त्याच्या मागें गिरणीचे उंच उंच भोंगे दिसत होते. उजव्या बाजूला मोठा चव्हाटा होता अन् ट्रामचा एकसारखा खडखडाट कानावर आदळत असे तर जरा पुढें मोठमोठ्या दवाखान्याच्या इमारती अन् त्याकडे जाणारा विस्तृत पण उघडा रस्ता आरोग्य मिळविण्याचे विशाल दारिद्र्य दाखवीत असे अन् डाव्या बाजूला एलफिन्स्टन स्टेशनचा ब्रीज. खालून जाणाऱ्या लोकल्स अन् वरून जाणाऱ्या माणसाची ती प्रचंड रीघ अन् तो जमाव ! सतीश नेहमी आपल्या सहकाऱ्याना म्हणत असे, 'बाबानो मुंबईचं सारं चैतन्य नि सारा उत्साह साडला आहे ह्या परळ भागातच ना ?' अन् त्याची साक्ष कामगार मैदानावर जेव्हा सभा होत असे तेव्हा त्या पिवळ्या पगड्याची ती प्रचंड धादल सावरता सावरता स्वतःची होणारी तारांबळ नि कोलाख्या उड्या काय लोकाना कळत नव्हत्या ह्या भागाची विस्तृत कल्पना यायला ?

मी सध्याकाळी इथ येताच मला अननुभूत आनंद होत असे. त्या कोंदट चाळीतून वर जाताना माझ्या मनात निराळेच विचार येत असत अन् वर आल्यानंतर अद्वितीय आनंदानं माझं मन वर वर जात असे. सिगारेटचे धूर सोडीत मी माझ्या सहकाऱ्याशी नि निरनिराळ्या कार्यकर्त्यांशी जेव्हा बोलण्यात रंगून जात असे तेव्हा अगदी खरच मी माझं व्यक्तित्व पार विसरून जात असे. आणि म्हणूनच मी माझ्या राजकारणात पडलेल्या नि येत असलेल्या मित्राना सतीशचे म्हणणं पटवून देत असें. 'आपलं स्वतंत्र व्यक्तित्व नि बडेजाव मिळविण्याचं काही राजकारण स्थान नाहीं. तेथें जर तुम्ही आपल्या मनाचा नि बुद्धीचा यज्ञ केलात तरच पुढें मिळणाऱ्या त्या वस्तूंच्या स्वतंत्रतेच्या ज्वाला प्रखर होतील अन् विरोधी सत्ता राखेसारखी भस्म होऊन आम्ही त्यावर उकळण्याकरिता ठेवलेल्या जनतेच्या भांड्यात लोकशाहीचं निर्भेळ सत्त्व जमा होईल.

× × ×

'जिम, असा रोखून नको ना रे बघूंस माझ्याकडे. मला तुझ्या तशा नजरेची भिती वाटते बाई. तूं विचार करतां करतां एखाद्या वस्तूकडे असा

रोखून बघतोस कीं ती वस्तु आता जळून खाक होणार कीं काय अशी भिती वाटते ! '

रात्री दहाचा सुमार होता. डेन माझ्याबरोबर होती. शिरीबालेच्या नाचाला आम्हाला जायचं होतं. आठ दिवस हे माझ्या इतक्या धावपळीत गेले की कल्याण ते मुंबई अन् मुबई ते कल्याणपर्यंत मजला मारून माझे हात पाय दुखूं लागले होते. दगदगीत न जेवण धड मिळालं होतं ना विश्राति. माझी दाढी वाढली होती. पण वेळात वेळ काढून मी एक बऱ्यापैकी सूट चढविला होता.

मी रेस्टॉरन्टमध्ये वेटरला हुकूम करून बसलो होतो. डेनची बडबड एकसारखी चालू होती.

' जिम सिगार पिऊन पिऊन नि चहाचे कपावर कप ढोसून तूं आपल्या शरीराची राखोडी करणारसं दिसतं बरं का ? बघ नारे समोर आरशात. तुझे गाल बसत चालले आहेत, चेहरा सुकून चालला आहे. असं का बरं जिम्. नीट वागत जा ना खाण्यापिण्याच्या बाबतीत तरी ! '

परवाच्या रात्रीचीच गोष्ट. असावरी मला बोलवायला आली होती. मी अगदी थकून गेलो होतो अन् तिला वचन दिलं म्हणून नकारहि देऊं शकलो नाहीं. पण नितक्यात सतीश आला. अन् तो येताच म्हणाला, ' जयंत, मी तुझ्या येण्याचीच वाट बघत होतो. चलतोस ना मग आता माझ्या बरोबर. चल जाऊन येऊं या आपण परळच्या सिमेंट चाळीच्या विभागात. '

मी सतीशची नि असावरीची ओळख करून असावरीला म्हणालों, ' तुम्हालाहि कार्य करण्याचा भलताच उत्साह आहे ना, मग चला ना आमच्याबरोबर ! '

तिच्या चेहऱ्यावरील बदलणाऱ्या भावनाची कांहींहि पर्वा न घेत मी तिला म्हणालों होतों, ' चला ना. एक खबरदारी घ्यायची कोणत्या भागांत नि कुठं आलों आहोंत असं विचारायचं नाहीं. सर्व समजून घ्यायचं बरं का ? '

ती आपले ओठ विलग करीत म्हणाली, ' बरं तर चला ना. माझी कांही ना नाहीं. ' अन् असं म्हणून तिनं आपल्या कपाळावरच्या केसांच्या

बटा बाजूला सारण्याचा जो विलोभनीय प्रयत्न केला तिकडे सतीशची कणखर नजर खिळल्याशिवाय राहिली नाही.

आमच्या मालकीच्या मोटारमधून जाता जाता सतीश म्हणाला, 'जयंत, आपल्यात कार्यकर्ते चागले आहेत नाही? पण काही जण निष्काळजीपणामुळें काहीतरी करून ठेवतात. बघ ना आज सकाळी मी एका कार्यकर्त्याला एक चिठ्ठी दिली होती. या चिठ्ठीत सिमेंट चाळीतल्या पाचशे लोकाच्या मताची बाजू आपल्याकडे ओढण्याची जादू होती पण तो तरुण ती तिथ ध्यायचा विसरला अन् संध्याकाळी मी त्याला विचारताच त्यानं हजार कामाच्या सबबी पुढ केल्या. मला खूप राग आला होता. मी तशीच त्याच्याजवळून चिठ्ठी घेतली अन् त्याचे कपटे कपटे करून त्याच्या अंगावर रागानं बोलत बोलत ते उधळले. अन् तेथून जो आलो आहे तो थेट तुझ्याकडे. ह्या वेळपर्यंत तिथं काय झालं असेल कुणाला ठाऊक! पण आता चव्हाणला भेटून अन् काही चाळींतल्या कार्यकर्त्यांना जमा करून प्रयत्न करून पाह्यचा.'

'मग तो कार्यकर्ता आपल्यापासून दूर जाईल अन् काम करण्याचं सोडून देईल. अन् अशा रितीनं केवळ तुमच्या रागानं एका चागल्या माणसाला गमावल्याचं नुकसान पदरी घ्यावं लागेल!'

'अंहं असावरी,' मीं सतीशच्या चेहऱ्याकडे बघत म्हटलं, 'तसं काहीं होणार नाही. जेथे शिस्त पाहिजे आहे तिथं असले प्रकार होणारच. येवढ्या व्यापक चळवळीत कोण कुणाच्या भावना शाबूत ठेवणार अन् ठेवून तरी का घ्याव्यात कुणी तशा! दिलेली कामगिरी मुकाट्यानं बजावली पाहिजे अन् शिस्त राखली पाहिजे. हा आमच्या आन्दोलनातला मुख्य दंडक आहे.'

तरीपण सतीश असावरीला म्हणाला, 'तुमची शंका बरोबर आहे. पण मी करून घेईन माझ्या चुकीची दुरुस्ती सकाळी बरं का?'

अन् नंतर मला हंसू आलं अन् त्यातच डेनचं मघाचं तें वाक्य बाहेर पडलं अन् मी जास्तच हसलों. समोरच्या खाद्यपेयांवर हात मारीत मी म्हटलं, 'अशी नजर तुझ्यावर का रोखली आहे माहित आहे का? तुझ्या नयनातलं सर्व हंसूं खेचून घेण्याकरता!'

पण मी हंसलों ते निराळ्याच कारणा करता. नंतर आम्ही चव्हाणच्या खोलीत शिरलों. अगदीं लहानशी अंधारातली ती खोली. खिडकी असूनहि तीत भाडी ठेवल्यामुळं ती इतकी झाकून गेली होती की मोठ्या मुष्किलीनं चंद्राचा प्रकाश फक्त दिसत होता तिथून. एक मोडकं टेबल अन् दोन तुटक्या खुर्च्या तिथं पडल्या होत्या अन् त्याखाली फाटकी सतरजी होती तीवर सतीश हक्कान बसला. मी टेबलावरची जागा पटकावली अन् असावरीन एका खुर्चीवर आसन स्थिरावलं. चव्हाण बाहेर गेला होता. सगुणा आम्हाला बसवून त्याला बोलवायला गेली होती. मी आणि सतीश काही तरी बोलत होतो तोच असावरीनं आपला मागे रुळणारा शेपटा छातीवर आणण्याचा प्रयत्न केला अन् तिची त्या खुर्चीवरून जी घसरगुंडी झाली ती सतीशच्या अंगावर. सतीशनं तिला सावरलं. ती आमच्याकडे बघून भलतीच लाजली. सतीशची अन् तिची डेनसारखी खूप जानपछान झाली असती तर तो अगदी असंच म्हणाला असता, 'तुम्ही बायका कुठंहि गेला तरी मानाचं स्थान पटकावयाला बघता अन् होते तुमची तिथून अशीच घसरगुंडी अन् घेता आधार पुरुषाचा.' असावरी लाजली खरी पण तो शेपटा तिन शेवटी पुढं घेतलाच अन् 'नको बाई ती खुर्ची. मी आपली खालीच बसते इथ मोकळी' अस म्हणत ती सतीश जवळ बसली. मी त्या दोघाकडे बघत म्हणालो, 'असावरी, हे मजूराचं जीवन आहे अन् आपल्यासारख्यानी तिकडे लक्ष घातलं की असे वर बसण्याचे नि खाली पडण्याचे प्रसंग येणारच मधून मधून.'

त्या बैठकीत सतीशचा विजय झाला म्हणून तो आनंदात होता. तो मोटारीतून निघून गेला अन् आम्ही दोघानी ट्रामकडे मोर्चा वळविला.

रस्त्यावर चादण्याच्या प्रकाशाशिवाय नि आम्हा दोघाच्या अस्तित्वाशिवाय जागेपणात बऱ्याच अंतरापर्यंत कोणीच दिसत नव्हतं. असावरी माझ्याकडे नि मी असावरीकडे पाहूं लागलो. नतर ती मला म्हणाली, 'हं मग आता काय? आमची गाण्याची बैठक बुडविली शेवटी तुम्हीं! आता काय सागणार बाबाना मी!'

मी तिचा हात हातात घेत म्हटले, 'आपली ही बैठक तुझ्या त्या गाण्याच्या बैठकीपेक्षा सरस नव्हती का असा? तुझ्या त्या बैठकींत थोडा

वेळ चार लोकाची करमणुक होईल पण आपल्या ह्या बैठकींतून भवि-तव्यतेच्या त्या जीवनसंगिताची आपण तयारी करीत आहोंत ना ! '

मीं तिचा मऊ मऊ हात जास्तच दाबीत म्हटले, ' मग सांग ना कोणती बैठक तुला मुख्य वाटते ? '

तिचे वदन चद्रापेक्षाहि सुंदर वाटू लागलं मला. तिचे ते नयन तारकापेक्षांहि चकाकणारे भासूं लागले अन् तिचे शरीर त्या स्वर्गीय मोहक प्रकाशापेक्षाहि शीतल अन् शात वाटूं लागलं मला.

' जयंत ह्या बैठकीचें तंत्र मला आताच उमगणार नाही पण तुमच्या आजच्या सहवासान मात्र मला काहीतरी मिळाल्याचा भास होत आहे— तुमची ती बैठक, तुमच ते भाषण अन् माझ्याशी सवाद हे सर्व बघून. अन् तुम्ही मला विश्वासात घेतल्याबद्दल मला माझं हृदय उचंबळून येत आहेसं वाटतं. '

तिचा हात सोडीत मी म्हणालो, ' तर दिसतच आहे ना ! हा सुद्धा वर्षाव नाही तर तुझ्या ह्या हृदयातला उचंबळून आलेला पदार्थ म्हणजेच चंद्रप्रकाश असच ना ? पण असा, मी तुला विश्वासात घेतले कशावरून ? '

ती माझा हात हातात घेत माझ्या चालण्याच्या गतीला थाबवीत म्हणाली, ' आता तुम्ही माझ ' असा ' हे नामाभिधान केलं म्हणून...'

मी खो खो करून हंसलो अन् अति हास्यात तिचीहि मुद्रा गुलाबी गुलाबी झाली अन् असावरीबरोबर तिच्या घरी जाण्याकरिता जाणारी ट्रॅम गाठली !

शेवटी डेन माझ्या कोटाची बाही खेचीत नि हात हातात घेत म्हणाली, ' जिम तूं काहीहि म्हण पण असं दुर्लक्ष नको ना करूंस आपल्या प्रकृतीकडे तूं. शिरीबालेनं तुला असं बघितलं तर ती काय समज करून घेईल तुझ्याबद्दल अन् किती हिणवील ती मला तुझ्याबद्दलच्या माझ्या निष्काळजीपणाबद्दल. '

' हो, मी तिला आतां सागेन डेन आताशीं फारच वाईट वागूं लागली आहे माझ्याशी. आठवडान् आठवडा ती भेटत नाही मला ! '

' तर खोटेरडा कुठचा ! कितीदां यावं रे तुझ्या घरी. पत्ता नाही. कितीदां चकरा माराव्या तुझ्या संपादकीय कचेरींत. तुझा ठिकाणा नाही !

अन् पुन्हा माझ्यावर बोल. म्हणे भेटत नाहीं.'

'मग ? त्याला आतां उपाय ?' मीं तिच्यावर दृष्टि रोखीत म्हटलं.

ती माझ्यापुढं बोटं उभं करीत नि डोळ्यांची फिरवाफिरव करीत म्हणाली, 'त्याला उपाय एकच. तूं पपाला दिलेलं तें आश्वासन !'

मीं गालांतल्या गालांत हंसत नि जाग्यावरून उठत म्हटलं, 'अरे वेळ होईल कीं थिएटरमध्यें जायला आपल्याला.' अन् पुढें म्हटलं, 'डेन, पपा जाणार केव्हां आहेत ग काश्मीरला ?'

'जाणार आहेत कदाचित् पुढच्या आठवड्यांत ! पण जिम अगदीं वस्ताद आहेस हं तूं. अगदीं शेवटच्या वेळेपर्यंत कळूं देणार नाहींस तुझीं कारस्थानं. अन् म्हणे माणसांनी करून दाखवावं बोलण्याच्या बडबडीपेक्षां. पण ज्याच्याकरितां तूं कांहीं करणार आहेस तें त्याच्यापाशीं तर बोलून दाखवायला पाहिजे ना तुला ?'

---

# १०

सिगारेटचा धूर अंतराळांत गडप करीत मी विचार करीत होतों. श्रीमंत होणं हाच काही जगात यशस्वी होण्याचा मार्ग नाहीं. पैसा हाच सुखाचा माध्यम असता तर किती तरी पैसेवाले लोक आपल्याला सुखी दिसले असते.

रात्री थिएटर चिक्कार भरले होते. मी डेनबरोबर तेथें प्रवेश केला. बाल्कनीच्या उजव्या बाजूला काही तरुण बसले होते. आम्ही जागेबर बसलो. माझ्या कानावर त्या घोळक्यामधून काही वाक्यें आली. 'ही जी नर्तकी आहे ना हिचा भाऊ आमच्याबरोबर ज्युनियरला होता.' अन् एक मुलगी पुढं वाकून म्हणाली, 'हो. अन् ही नर्तकी माझ्याबरोबर कॉलेज-मध्ये होती. त्याच वेळेस ती एक तारका अन् जहाबाज कॉलेजकुमारी म्हणून ओळखली जात होती.'

मी बाजूला बघितलं. चेहरे अंधुकसे दिसत होते, पण ओळख पटत नव्हती. माणूस जसजसा उंच पायऱ्या चढत जातो तसतसा त्याच्या आधीच्या आयुष्यात येणाऱ्या साधारण परिचयाच्या व्यक्ति तो विसरून जात असतो.

मधल्या विश्रान्तीत आम्ही शिरीबालेला भेटायला गेलों होतो. तेव्हां अगोदर मी तिला प्रश्न केला, 'बाले स्त्रिया पुरुषाचे संबंध किती तटकन् तोडतात ग!'

मला मध्येच थाबवीत ती म्हणाली, 'जया, आता कशाला काढतोस उकरून त्या गोष्टी?'

'नाहीं ग पेरिन, मी आता सुखात आहें. खूपखूप पैसे मिळत आहेत अन् पदरात अमोल यशहि पडत आहे.'

तारुण्य, पैसा नि लोकप्रियता ही तिन्ही बालेनं मिळविली आहेत. पण तें मनाचे समाधान तिला मिळत आहे का? तिच्या चेहऱ्यावर जिवंत उत्साह दिसत नव्हता अन् तिच्या खोल गेलेल्या डोळयातनं उठणाऱ्या उदासीनतेच्या झांकीनं जागा पटकावलेली होती.

शिरीबाला नाचते. किती गोड नाचते. पण ज्या गाण्याच्या पार्श्व-

भूमीवर नाचते तींत किती करुण भाव मिसळले आहेत !

सरबताचे प्याले टेबलावरून घेत मी तिला म्हटलं, ‘येशील का खोलीवर माझ्या ?’

पेरीन मध्येच म्हणाली, ‘ अन् माझ्या घरीं !’

ती हंसली. त्या हसण्यात काळ्या कुट्ट मेघात पडलेल्या चादणीची विरागता होती.

‘अं हं !’ तिनं नकारात्मक मान हलविली अन् पुढे म्हणाली, ‘जया, तुला मिळणाऱ्या लोकप्रियतेचं मी अभिनंदन केल हं. रोजच्या वर्तमानपत्रात तुझी नावं वाचून मला किती आनद वाटतो म्हणून सागूं ? आज दद्दा असते तर—’

आज दद्दा असते तर.

बालेचं अभिजात नर्तन पाहून त्यानीं यशाचे आनदाश्रु गाळले असते.

माझ्या डोळ्यात अश्रु तरारले. त्या भावविकल होऊन नाचणाऱ्या नर्तकीच्या डोळ्यातहि ते तरारले. मी डेनकडे बघितलं. तीहि उदास उदास होती.

शिरीनबाला जवळ आली. ती मला दृढ आलिंगन देत म्हणाली, ‘जया, माझ्या जया, आनंदात रहा हं.’

किती विरागी मनाचा आवेग होता तिच्या त्या वाक्यात.

डेनलाही तिनं मित्रभावाचं घट्ट अलिगन देत म्हटलं, ‘पेरीन नीट साभाळ हं माझ्या ठेवीला.’

मला कळलं, कलावताची कला पैशानं नसते. जगातला कोणताहि मोबदला त्या कलेचा विकास घडवून आणण्यास असमर्थ आहे. आयुष्याची अथाग खोली, ज्ञानाची विशालता, दु:ख आणि दारिद्र्य ह्याचं उत्कटत्व म्हणजेच कला आणि त्या कलेचा विकास करताना शरीरातील रक्ताचा कण नि कण आटविणं आणि आत्मिक समाधानाचा दिव्यानद भोगण हेंच कलावंताचें काम. हीच खऱ्या कलावंताची तपस्या.

× × ×

पपाच्या आताच आलेल्या फोनमुळं मला पुन्हा आठवण झाली. जी गोष्ट कल्पनेचा वास्तवतेत आनंद देते तीच मनाला प्रखर भासते.

पपानी माझ्याकडून आश्वासन घेतलं होतं की ' जयंत, आता माझे केस पिकले आहेत अन् आज ना उद्यां मी देवाच्या घरी जाईन. माझ्या धर्मबाधवानी मला पराङ्मुख केलं आहे. शेवटची माझी इच्छा म्हणजे मी माझ्या नातेवाईकाकडे काश्मीरला जाऊन रहाणार आहे. डेन तिकडे यायला तयार नाही अन् इथं तुझ्याशिवाय तिला कुणाचा आधार नाही. तिचं तुझ्यावर निस्सीम प्रेम नि भक्ति आहे. तुझ्याशिवाय तिचं जीवन नीरस आहे. पोरा लक्षात ठेव. लग्न ही आयुष्यांत क्रान्ति आहे. ती संधि एकदाच येते. लग्न ही लॉटरी आहे पण तुला ही जी संधि मिळाली आहे ती सुवर्ण-संधि आहे. तुझ्या ध्येयाला पूरक अन् तुझ्या खाद्याला खादा लावून तूं जिथं जाशील तिथं ती बुद्धिवादी पायावर यायला तयार आहे. मला तूं तिच्याशी प्रामाणिक राह्यचं वचन दे. विजयी होऊन सुखी असा.'

त्याचे ते उद्गार ऐकून रात्री स्वप्न पडल्याचा मला भास झाला. टॉलस्टायच्या कादंबरीतल्या एका नायकाचा एका नायिकेशी बंदिखान्यात गेल्यामुळे विरही दशेत राहण्याचा प्रसंग आठवून माझं तें रम्य स्वप्न भंग पावलं.

पण पपाची ती असहाय नजर माझ्यावर खिळली होती. त्यांच्या त्या व्यक्तित्वानं माझ्या मनावर जादू टाकली होती. मला आठवतं, १९३८ मध्ये कामगाराच्या गळयाला फास लावणारा संपबदीचा कायदा करून वर आणखी तो कामगाराच्या हितासाठीच आहे असें नामदार खेराचे सरकार जाहीर करीत होते. काळा कायदा हाणून पाडण्याकरता मजुरानी संप पुकारला होता. सात नोव्हेंबरमध्ये मुंबईत सर्वत्र धामधूम माजली होती. डिलाईलरोडच्या त्या प्रचंड मिरवणुकीत मी सतीशबरोबर होतों. नंदानी आणलेलं ट्रेड डिस्प्यूट बील, कॉंग्रेसने केलेला सहकार आणि विरोध ह्या सर्व प्रसंगानी लोक अशात होते. एकीकडे दडपशाहीविरोधी एकजुटीसाठीं कॉंग्रेस सरकारला पाठिंबा द्यायचा, आणि संपबंदी-कायद्याच्या निषेधाप्रीत्यर्थ हरताळाच्या दिवशीं गोळीबार करणाऱ्या कॉंग्रेस सरकारचा निषेध करायचा अशा अडचणीतून कम्युनिस्ट कार्यकर्त्यांनीं मार्ग काढला होता!

अन् तो गोळीबाराचा प्रसंग पाहून—कॉंग्रेसच्या राजवटींत असला प्रसंग पाहून नेते चवताळून गेले होते. मी उदास झालों होतों. शिरीबालेच्या

आदल्या रात्रीं घडलेल्या त्या प्रसंगामुळे माझ्या मनात जीवनाविषयीं बेदरकारपणाचा प्रादुर्भाव निर्माण झाला होता. मी एका हिरहिरीनंच एका सार्जटकडे धावलों. सभ्यपणाचे प्रश्न नि उत्तरं देण्याच्या आधीच तो आपला पिस्तूल माझ्यावर रोखीत म्हणाला, 'मला माहीत आहे तुम्ही ह्या लोकाचे म्होरके दिसता.' मीं माझ्या दळदार पंजान त्याच्या रूक्ष मनगटावर आघात केला अन् पिस्तूल पाडून माझ्या पायाखाली दाबला. तेवढ्यात माझ्या डोक्यात लाठीचा मार पडला. डोळयात काही तरी चमक आली अन् समोर कोणी तरी त्या सार्जटला जमिनीवर पाडल्याची मला अधूकशी कल्पना आली.

मला झालेली ती जखम जीवन नि मृत्यूची रस्सीखेंच होती. कारागृहाच्या त्या हॉस्पिटलमध्ये मी पडलो होतो. माझ्या साऱ्या वृत्ति बधिर झाल्या होत्या. मनातली ती जखम अन् शरीरातली ही जखम! डेननं नुकताच डाक्टरीचा कोर्स घेतला होता. तीही त्याच कारागृहाच्या दवाखान्यात येत होती. ती एक दिवस मला म्हणाली, 'जिम, काळा कायदा हाणून पाडण्याकरिता तू दिव्य केलंस पण तुझं शरीर किती हाणून पडलं त्या दिव्यात!' मी उलट तिला म्हणे 'डेन असं किती तरी दिव्यातून जायचं आहे आपणा सर्वांना. तूं मला नवशक्ति दिलीस. तूं जर मला भेटली नसतीस तर–तर ह्या नश्वर जगात माझा आत्मा त्याच दिव्याचा साक्षात्कार घेण्याकरिता निघून गेला असता कुठं तरी. पण तो आहे अन् तुझ्या पुलकित सहवासानं असल्या हजारो दिव्याचं आन्दोलन माजविण्याचा मला आत्मसाक्षात्कार होत आहे.'

ती माझा हात दाबीत नि केसावरून हात फिरवीत म्हणाली, 'काय? आन्दोलन? अजूनहि तुझी इच्छा प्रबळ आहे एवढा गोळीबार झाला असताना सुद्धा!'

'तूं वेडी आहेस. हा गोळीबार हजारो नि लाखो अज्ञानी लोकाना क्रान्तीचं औषध आहे. त्याच्या त्या सुप्त भावना जागृत करायचं ते एक साधन आहे. अन् म्हणूनच ना आम्हाला असल्या दिव्य दिव्य आन्दोलनाची अधिकाधिक गरज आहे.'

तिनं आपली मोहक नजर माझ्यावर किंचित् काल स्थिर केली,

अन् 'किती किती अभिमान वाटतो रे तुझा' असं म्हणत पहिल्यादाच माझ्या मिटलेल्या ओठावर आपले ओंठ टेकले. ते चुंबन अविनाशी आहे. डेनमुळंच मी त्या वेळेस वाचलो–पपानी, श्रॉफनी बेफाट मुदत सहा महिन्यावर ओढून घेतली कारागृहाची म्हणून......

'मग जयंत ठरला ना हा तुझा विचार?' पपानीं आपला हात पुढे करीत म्हटलं.

अन् मीं माझा हात त्याच्या हातात ठेवीत म्हटलं, 'तुम्ही अगदी निष्काळजी असा हं पपा.'

पपाचा फोन आला होता अन् ते संध्याकाळच्या गाडीनं मुंबई सोडणार होते.

अन् डेननं त्या रिसिव्हरमधून मला फोन केला होता, 'जिम ये बरं का स्टेशनवर पपाना सेन्ड ऑफ देण्याकरिता. हजार कामं बाजूला ठेव नि ये. प्लॅटफार्मवर एकसारखी माझी नजर तुला धुंडाळीत असेल.'

---

# ११

‘ जयंत, काल मला संजीव भेटला होता, अन् त्यानं मला सांगितलं की, ‘सर्व विद्यार्थी कार्यकर्त्यांनीं एक परिषद भरविण्याचं ठरविलं आहे म्हणून !’ परवा संध्याकाळीं मिस् धनंजय सुद्धा असंच कांही तरी बोलत होती रूपमती दातार जवळ. पण मला वाटतं तुझा ह्यात भाग असावा. काय बरोबर आहे ना जयंत ?’

मी सिगारेट शिलगावीत सतीशला म्हटलं, ‘अरे कसला आला आहे माझा भाग त्यात ? ती कल्पना आहे सर्व त्याच लोकाची अन् शेव-टास नेणारहि आहेत पण तेच लोक.’

‘कल्पना मला पसंत आहे जयंत. पण ह्याचा सार्वत्रिक फायदा कुठपर्यंत होईल हा मुद्याचा प्रश्न आहे. हे आजचे तरुण हिरहिरीनं कार्य करतील अन् पैसे जमा करतील. पण माझा जो आक्षेप आहे तो हा कीं, त्याच्या पाठीमागें काही तात्त्विक भाग आहे कीं नाही ह्यावर !’

‘सतीश, तुझी तत्त्वं अन् मुद्दे विनाकारणच टेबलावर गुद्दे देतात बुवा. ह्या तरुणाना प्लॅटफार्मवर तर येऊं दे. त्याच्या मतामतांच्या संवाद-नानं वातावरण तर थरारूं दे. मग पुढें पाहूं त्या तुझ्या तत्त्वाची ती पार्श्वभूमि. मी त्याना पाठिंबा दिला आहे तो ह्या करता की विचारविनि-मयानं ते काही तरी निश्चित धोरण ठरवतील.’

‘जयंत, विश्राम दातेची न् माझी तूं ओळख करून दिली आहेस अन् त्याला मी चाचपून पाहण्याकरता कामंहि दिली आहेत. बघूं या तो त्या बाबतींत पूर्णपणे किती उतरेल तें !’

‘तूं त्या बाबतीत निःशंक अस सतीश. पूर्ण विचार करून अन् त्याच्या कार्याचा आपल्याला फायदा होईल म्हणूनच त्याला मी खेंचत आहे आपल्या गटांत. त्याची विचारसरणी जरी समाजवादी असली तरी त्याला जर आपण कार्याची जोड दिली नि त्याच्यावर जबाबदारी टाकली तर तो पूर्णपणे समाजसत्तावादी बनेल असं मला वाटत.’

‘मग जयंत असं कां करींत नाहीं ? त्याच्यावरच का नाहीं टाकीत जबाबदारी मजुराच्या भागांतल्या कामाची !’ प्रदीपन हे वाक्य बाहेर

काढून आपण बऱ्याच वेळापूर्वी संपादकीय ऑफिसमध्यें आल्याची जाणीव करून दिली.

'हो असंच करूं या जयंत नाही. आतां आपले हे विद्यार्थी कार्यकर्ते त्या 'तरुण महाराष्ट्र युवक विद्यार्थी परिषदें'त रंगून जातील अन् इकडे ह्या मुलांची होईल हेळसाड शिक्षणाची. तरी त्या ठिकाणी नवीन आलेले कार्यकर्ते शिक्षक नेमून अन् त्याची सर्व जबाबदारी विश्रामवर सोपवून आपण सर्व निर्धास्त होऊं या या बाबतीत तरी.' मी म्हणालो.

तितक्यात अजित आला अन् हास्यमुखानं आमचं वातावरण बदललं. तो येताच आपल्या विशाल छातीवरचा जरीचा टॉय ह्या हातावरून त्या हातावर घेत म्हणाला, 'अरे मी तुम्हा सर्वांना आनंदाची खबर द्यायला आलो आहे.'

मी उत्सुकतेनें त्याचा हात धरीत नि त्याला खुर्चीवर बसवीत म्हटलं, 'सांग काय आहे ती खबर?'

'आता मला तार आली आहे मिस् नदिनी घोषची कलकत्त्याहून. अन् कदाचित् पुढच्या आठवड्यात मी परत भेटेन एका नवीन कार्यकर्तीला घेऊन.'

प्रदीप त्याला हसत म्हणाला, 'म्हणजे लग्न करणार आहेस कीं काय? बाकी केलंस तर तुझ्या आयुष्यात जास्त उत्साह अन् जास्त चलाखी येईल असं मला वाटत.' अन् प्रदीप माझ्याकडे पहात म्हणाला, 'अन् जयंत तुझा बेत काय बुवा आहे?'

मी भेदरलेल्या दृष्टीनं सतीशकडे दृष्टि वळविली नि विचारलं, 'काय रे, हे प्रेमाचं त्रागड काय आहे सतीश! तुझाहि आहे काय कुणावर प्रेम?'

सतीशच्या कठोर दृष्टींत मला हास्य दिसलं अन् तो सर्वांकडे पहात मला म्हणाला, 'हो आहे तर. त्याशिवाय कसं होणार?'

प्रदीपला त्याच्या बोलण्यानं धक्काच बसला अन् तो सतीशला म्हणाला, 'अरे कोण आहे ती तें तर सागशील.'

सतीश रेलला होता तो उठून बसला अन् त्याचा तो चेहरा पहिल्या-

सारखाच त्रासिक नि कठोर बनला. तो म्हणाला, 'हो माझं प्रेम आहे क्रान्तीवर! तिच्यावरच माझं एकनिष्ठ प्रेम आहे. एखाद्या स्त्रीच्या नादीं लागून आयुष्याचा प्रवाह खर्च करण्यापेक्षा ह्या गोष्टीच्या पाठीमागं लागेन तर किती तरी लोकाचा फायदा होईल. स्त्री ही गूढ आहे अन् तिला मिळवण्याकरतां किती तरी खेळ खेळावे लागतात. क्रान्तीहि तितकीच गूढ आहे अन् ती मिळविण्याकरताहि त्यापेक्षाहि जास्त खेळ खेळावे लागतात.' नंतर त्याच्या मराठीचा आवेग कमी झाला म्हणून तो इंग्रजीत म्हणाला, 'I love Revolution, I love her most! Oh!! Revolution thy name is Woman!'

अजितला ही सतीशची वागणूक काहीं बरोबर वाटली नाही. तो काहीतरी बोलणार होता तितक्यात प्रदीप म्हणाला, 'सतीश, आपण मागच्या बैठकीत ठरविल्याप्रमाणे हळुहळु ती सुवर्ण संधि येत आहे. पुढच्या दहा डिसेंबरला ट्रेड युनिएन कॉंग्रेसची वार्षिक निवडणूक आहे अन् ह्या वर्षी कार्यकारी मंडळात सेक्रेटरी निवडला जाणार आहे ट्रेड युनिअन कॉंग्रेसचा अन् फक्त प्रेसिडेन्ट रहाणार आहे इन्डिअन लेबर फेडरेशनचा..'

पण मघाशी अजित आल्यापासून सतीशची का त्रेधा उडावी कळत नव्हतं. तो उठला नि म्हणाला, 'बरी आठवण झाली. गेलंच पाहिजे मला.' अन् तो अजितकडे वळून म्हणाला, 'अरे अजित, पण परत येशील ना नक्की पुढच्या आठवड्यात का मारीत बसशील मजा वैवाहिक सुखातल्या?'

'नाहीं. सतीश तूं गैरसमज करून घेतला आहेस. स्त्रीविषयक तुझीं मतं का वाईट असावीं काही कळत नाही. पण वैवाहिक सुखानं मी क्रांति-कार्याला मुकेंन हें तर मला मुळीच पटत नाहीं. मी कलकत्त्याला जाईन अन् तेथून एकदोन दिवसानी काश्मीरला जाऊन माझ्या एका मित्रानं काढलेल्या सिनेमा कंपनीच्या उद्घाटनसमारंभाला हजर राहीन अन् तेथून मी येथेंच येईन. अन् मी एकटा न येता दुसऱ्यालाहि कार्य करण्या-करता आणीत आहें म्हणून तुला तर आनंदच वाटला पाहिजे सतीश.'

'बरं तुम्हाला वाटेल तसं करा. पण तुमच्या वैयक्तिक बाबीनं पुढच्या विधायक कार्यक्रमाला खीळ पाडूं नका एवढंच माझं म्हणणं आहे.'

सतीश निघून गेला अन् त्याच्या पाठोपाठ प्रदीप नि अजितही निघून गेले.

× × ×

संपादकीय ऑफिसमध्यें मी एकटाच बसलों होतों. पुन्हा सिगारेट पेटविण्याची माझी इच्छा होईना. पोऱ्यानं आणून ठेवलेल्या चहाकडेहि माझं लक्ष जाईना. सतीशच्या त्या वाक्यानं माझ्या मनात एकसारखे पडसाद उठत होते. 'तुमच्या वैयक्तिक बाबीनं विधायक कार्यक्रमाला खीळ पाडूं नका.' सतीशला स्त्री अन् प्रेम ह्याचा संपर्क लागला नसावा की लागूनहि त्याला काही विशिष्ट अनुभव आला असावा! मला अजितचं म्हणणं पटतं. तो नेहमी म्हणत असतो, 'प्रेमाशिवाय जीवन व्यर्थ आहे. प्रेमाचा मध जर जीवनात घेतला नाही साठवून तर हा जीवनाचा घट रिता राहील अन् मग कुणाहि माणसाचं लक्ष न जाता तो तसाच पडून राहील किंवा त्याला एका बाहुल्याचं स्वरूप येईल. प्रेम, क्रान्ति अन् राजकारण ह्याचा फार निकट संबंध आहे. प्रेम ही एक विशाल शक्ति आहे. त्या प्रेमशक्तीच्या योगं अणुपरमाणु निकट निकट येतात अन् विराट संग्राम उभारण्यास सहाय्यक होतात.'

प्रेमाचं शास्त्र अजून काहीं मला उमगत नाहीं. मागें माझं शिरीबालेवर प्रेम होतं. पण त्याची परिणति तशी का व्हावी? मला डेन हवी हवीशी वाटते. तिच्या सहवासात मला सुख वाटतं, अद्‌भुत इतिकर्तव्यता वाटते अन् दिव्य वाटतं. पण असावरीला पाहून माझी ती कल्पना फोल ठरते. तिच्या विषयी मला निराळेच आकर्षण वाटत आहे. ज्या आकर्षणाचा प्रादुर्भाव शिरीमध्ये अन् डेनमध्ये बघितल्यावर झाला नाही तो भाव! का असावं बरं असं? असापेक्षां डेन सुंदर आहे. माझ्या मनाला न बदलण्यासारखं तिचं लावण्य खचित विलोभनीय आहे. मग असं का व्हावं?

असा!

तिची माझ्या मनावर पडलेली भुरळ क्षणिक आहे पण त्या क्षणिक मोहिनीची भुरळ माझ्या मनाला धक्के देत आहे. निरागसतेच्या खोल गर्तेत नेण्याचीहि शक्ति तिच्यात आहे.

त्या दिवशीं रात्री मी असाच्या घरीं गाण्याच्या बैठकीला हजर राहिलों होतों. पेडर रोडच्या एका विशाल बंगल्यांत बॅरिस्टर धनंजय रहात होते. बंगल्याच्या आवारात शिरताच त्या चंद्रप्रकाशात रातराणीचा सुगंध नाकात अन् आतल्या गायनाचे मधुर स्वर कानात शिरले अन् मी असाला म्हणालों, 'सुगंध, संगीत, सौंदर्य अन् प्रकाश ह्याचा थोडासा सुद्धां सहवास माणसाचा शीणभार हलका करण्यास किती हितावह होतो.' त्या वेळेस तिनं म्हटलं होतं, 'पण ही सर्व एकाच वेळेस माणसाला मिळत नसतात अन् तुम्हाला ती एका वेळेस मिळालीं आहेत. किती भाग्यवान् अहात तुम्ही!'

पण बॅरिस्टर धनंजयानी माझं स्वागत केलेंच शेवटी. असानं माझी व त्याची ओळख करून दिली. बरेचसे पाहुणे गाण्याच्या जलशाला हजर होते. गाणारा हा गवयी नसून एक अभिजात सिनेमा नटी होती अन् तिची नृत्यकला सुद्धा बाहेर येणार होती म्हणे.

एका प्रशस्त दिवाणखान्यात पन्नास साठ मंडळी बसली होती अन् पुढें उंच जागा करून त्याला थिएटरच्या डायसचं स्वरूप आणलं होतं.

माझ्या पसंतीप्रमाणं असानं मला अगदी शेवटच्या रांकेत बसविलं अन् 'ही मी आलेंच हं' असं म्हणून निघून गेली.

खरं म्हटलं तर तेव्हा मी असा थकून गेलों होतों कीं त्या संगीताच्या सुरात मला अंगाई गीताची आठवण होऊं लागली होती अन् मी त्या कोचावर अगदीं मनमोकळेपणानं बसण्याचा फार्स करून निजण्याचं सुख अनुभवीत होतों.

तितक्यात 'जयंत, जयंत' म्हणून कोणीं हांक मारली अन् मी त्या व्यक्तीकडे पहातांच ती माझ्या जॉईन्ट कोचच्या रिकाम्या जागेंत माझ्या खांद्यावर हात ठेवून बसली.

माझ्या ग्लानि भरलेल्या नयनात जागरूकता आली नि मीं त्याच्याकडे बघितलं तों काय?—माझा मित्र दिलीप!

मला आठवलं दिलीप माझा मित्र होता. इतकंच नव्हे तर बरोच्या कुटुंबांत नि आगाशे घराण्यांत त्याचा घरोबा होता. त्याची उंची अन् जाडी एखाद्या कृश झालेल्या पहिलवानासारखी दिसत होती. केसांचा उलटा भांग पाडून त्याचे पंख करून कानावर विस्तारण्याची त्याला खोड

होती. त्याच्या लांब नि निमुळत्या नाकानं त्याच्या पसरट नि लांब गालां-वर जरी मोहकता दिसत असे तरी पण एखाद्या सूज्ञ माणसाचा त्याच्याबद्दल दुराग्रहच होत असे. लहानपणापासून त्याला फोटोग्राफीचा भलताच नाद होता अन् कुठेंहि सभासंमेलनामध्यें नि विद्यार्थी–विद्यार्थिनीच्या गॅदरिंग-मध्यें तो दिसताच त्याच्या गळ्यात कॅमेरा सदोदित लटकलेला असायचा. तोंडातून सिनेमा अन् संगीताशिवाय बोलायला त्याला दुसरा विषयच नव्हता. मध्यंतरी बरीच वर्षं तो युरोपात निघून गेला होता. त्यानंतर बरेच वर्षांनी तो मला त्या तशा स्थितीत भेटला होता. त्याच्या छातीवर हिरवा टॉय लटकत होता अन् अंगात हिरव्या पामरीजचा सूट झळकत होता.

'दिलीप, अन् तूं इकडे कुठं ?' मी आनंदातिशयानं त्याच्या हातात हात देत म्हटलं, 'किती दिवसानी आपण भेटत आहोंत दिलीप, नाहीं ?'

'जयंत, तुला वाटत असेल मी युरोपमधून काही पदवी घेऊन आलों असेन म्हणून. पण नाही. खूप पैसा खर्च केला. जीवनाच्या उच्च उंच हिंदोळ्यावर मीं झोके खाल्ले आणि एक मनाशी निश्चित कल्पना बाळगून युरोपमध्यें युद्धाचें होमकुंड पेटण्याच्या आधींच तेथून हिंदुस्थानला कूच केलं !'

'कलकत्त्याला मी अजितकुमारला भेटलो होतों. अरें हो अन् नंदिनी घोषलाहि. किती किती सुंदर आहे ती नंदिनी. खरोखर अजित नशीबवान आहे !'

पण त्याचं हे भारूड बंद करण्यासाठी मी म्हणालों, 'अरे, पण मला हें तर सागशील ना तूं युरोपच्या होमकुंडातून कोणती निश्चित कल्पना बाळगून आला आहेस इथं.'

सिगारेटचा डबा माझ्यापुढ करीत तो म्हणाला, 'हो. ती म्हणजे ही कीं—पुढच्या महिन्यात काश्मीरला जाऊन सिनेमा कंपनी काढणार आहें एक. तुझी ती ध्येयं नि रम्य चित्र मला तर काही कळत नाहीत. पण दाखवीन मीहि काही अलौकिक करून तुला.'

मीं सिगारेटची राख झाडून नि त्याच्या त्याच त्या प्रश्नाच्या लांब उत्तराना कंटाळून त्याला म्हटलं, 'अन् तूं असा अनपेक्षित आलास कसा ?'

‘ माझ्या सिनेमा कंपनीचं बॅरिस्टर धनंजयना लॉ अॅडव्हायसर नेमलं आहे. माझं मुख्य ऑफिस मुंबईतच आहे अन् फक्त स्टूडिओ आणि शूटिंग काश्मीरात ठेवणार आहे. त्याच दृष्टीनं माझा नि धनंजयचा संबंध आहे. अन् ही नटी कदाचित् तुला माहीत असावी. आपल्या शिरीनची कॉलेज मैत्रीण सरोज. हो पण जयंत, शिरीन नि पेरीन ह्याना भेटायचं आहे मला. दोन महिन्यापासून मी मुंबईत आहे पण कामाच्या धादलीमुळं तुम्हा सर्वांना भेटण्याचं सुद्धा राहून गेलं.’

‘ दिलीप, पैशाच्या मागं माणूस लागला कीं तो आपल्या प्रिय माणसाना विसरून जातो अन् तूं भेटणार आहेस कशाला त्याना ते मी समजलो. मागे तूं आपले पुढचे मनोरथ त्याना सागत होतास अन् आतां त्यानीं प्रत्यक्षपणे कार्य करावं म्हणूनच नाही का ? बाला सुंदर नाचते म्हणून तूं तिला आपल्याकडे ओढणार अन् डेन ?–तिचं सौंदर्य पणास लावून तिला लोकप्रियता देणार असाच आहे ना तुझा विचार ? जेव्हा भाडवलदार लोक आपल्या ओळखीचीहि पण ओळख विसरून गेलेल्या माणसाकडे परत धाव घेतात तेव्हा त्याच्या मनात स्वार्थी हेतु असतोच असतो बरं का दिलीप.’

‘ जयंत, तुला तें कळणार नाहीं अन् ते कुणालाच कळणार नाहीं. अप्रत्यक्ष वस्तु प्रत्यक्षात आल्याशिवाय तुम्हाला पटवून तरी कसं देऊं ! ’

दिलीप ते अगतिक वाक्य बोलून शात झाला अन् थोड्या वेळानं मला म्हणाला, ‘ जयंत, तूं कसा आलास रे इथं ? अन् तुझ्याबरोबर आलेली ती मुलगी धनंजयाची कन्या आहे ना ? ’

‘ हो. तिचा नि माझा संबंध फक्त आन्दोलनापुरताच आहे. तिनं आमच्या चळवळींत कामें करायला सुरवात केली आहे अन् त्या निमित्तानं.......’

अन् माझं पुढचं वाक्य थाबवीतच तो म्हणाला, ‘ म्हणजे ? काय म्हणतो आहेस काय तूं जयंत ? तूं जर तिच्याबरोबर राहिलास तर तुझं आयुष्य नि तुझी चळवळ धोक्यांत येईल, माहीत आहे तुला ? तिचा वडील भाऊ पोलीस सार्जेटच्या हुद्यावर आहे.’ अन् अंगुलिनिर्देश करून तो म्हणाला, ‘ बघ पुढच्या रांगेत त्या आंग्ल स्त्रीशेजारी बसलेल्या गण-

वेषांतला लाल जर्द माणूस ! तोच आहे तिचा भाऊ. त्याचं नांव आहे भैरव ! '

घड्याळाला खूप खूप चावी द्यावी नि मग आंतली बालकमान निखळून काट्याची सरासरा धाव सुरू व्हावी तशी माझ्या मनाची स्थिति झाली.

माझ्या मनात किती काहूर माजलं दिलीपच्या त्या वाक्यानी अन् दिलीपच्या संभाषणाला किती असंदिग्ध उत्तरं पडत होती त्यामुळं माझीं !

दिलीप माझ्या खोलीचा पत्ता घेऊन नि भेटण्याचं योजून आपल्या जागेवर निघून गेला.

अन् पाचसात मिनिटानी असानं त्या कोपऱ्यावर आसन घेतलं.

ती मोहक अभिनय करीत म्हणाली, ' मन रमत असेल तुमचं इथं नाहीं ? त्या दिवशीच्या नाचासारखे प्रसंग आपल्या समाजात नसल्यामुळं मला बाकी खत वाटते. '

अन् मी म्हणालों, ' हो अन् मलाहि तशीच खंत वाटते ' अन् दिलीपनं दिलेल्या सिगरेटचा चटका लागल्यामुळं मी असाकडे घाबरून बघितलं. मी म्हटलं, ' असा बरं घेतों आता मी रजा. उद्यां बरीच महत्वाचीं कामं आहेत मला. ' अन् तिच्या उत्तराची वाट न बघता मी वाट चालूं लागलों. बॅ. धनंजयाच्या साभिनय आग्रहाला मी नकार देऊन फाटकापाशीं आलों. मनात माझ्या गडबड सुरू झाली होती. पण ज्या निसर्गाच्या वातावरणांतून त्या बंगलींत मीं प्रवेश केला होता तें सर्व तसंच होतं पण असाची ती सुंदर काया ! तीत अविश्वास कीं निष्पापता असावी याबद्दलचें युद्ध माझ्या मनांत सुरू झालें.

तिच्या प्रश्नांची उत्तरं मी हूं हूं करून देऊं लागलों अन् नमस्ते करून चालूं लागणार तेव्हा तिनं हातात हात घालून अभिवादनाचा प्रकार चालविला. येवढ्यावरच नव्हे तर माझ्या हाताचा अन् तिच्या त्या मादक जिवणीचा स्पर्शहि केला तिनं त्या वातावरणात ! त्या स्पर्शात एकीकडे माझ्या बुद्धीला असंख्य सुया बोंचल्याचा भास झाला तर माझ्या प्रेमळ हृदयाला मधुर झङ्कारल्यासारखं वाटलंही त्याच स्पर्शानं !

मी रस्त्याला लागलों अन् टॅक्सी करून खोलीकडे परत येऊं लागलों,

तेव्हा तें डेनचें त्या बॉलमधलें वाक्य आठवलं. ' पण जिम, सावध अस हं तिच्यापासून ! '

डेनच्या त्या वाक्याचा उलगडा दिलीपनं किती मित्रप्रेमानं सहज करून दिला होता. मीं त्याचा तेथें असताना उपहास सुद्धा केला.

आणि म्हणूनच मी जरा अगतिक झालो, सतीशचं तें आत्ताचं वाक्य ऐकून–' तुम्ही आपल्या वैयक्तिक बाबीनं विधायक कार्यक्रमात खीळ पाडूं नका ! '

---

# १२

भांडवलदारी जगाला धक्का देण्याकरिता आम्ही कामगाराचा मोर्चा पुढं पुढं ढकलीत आहोत. सुखवस्तु माणसं कोणत्याहि संघर्षाच्या प्रसंगाची हारजीत पहाण्यास टपून बसलेली असतात. पण कामगाराचा लढा ह्या सर्वाहून निराळा आहे. ॲन्जेल्सबरोबर काढलेल्या कम्युनिस्ट मॅनिफिस्टो-मध्ये मार्क्स म्हणतो की 'अखिल जगातील कामगारानो, एक व्हा. लढा हरलात तर तुमच्याजवळ हरण्यासारखं आहे काय? पण जीत मिळविलीत तर मात्र ते सुखासीन भवितव्यतेतील सारं जग तुमचं आहे आणि हीच एक उदात्त शिकवणूक आहे.'

काहीही असो, ट्रेड युनिअन कॉंग्रेसनं महागाई भत्त्याच्या आन्दो-लनाचा ठराव पास करून घेतला होता.

पण त्याची रूपरेषा अन् पुढचा महान् विधायक कार्यक्रम आखण्या-करिता एक मोठी परिषद भरविण्याचा कार्यकर्त्यांचा विचार मूर्त स्वरूपात येऊं लागला होता.

पुढाऱ्याकडन पत्रकं काढण्यात आली होती. साऱ्या वर्तमानपत्राचे रकाने उजाडलेलं युद्ध अन् मजुरावर आर्थिक अत्याचार याची जाणीव करून देत होते.

मुंबईला यांत्रिक युगात मजुराना गिरक्या खायला लावून चैन भोग-णारा नि तिकडे नोकरशाहीशी लाळघोटेपणा करणारा भांडवलदार वर्ग मात्र गाफिल होता. पुढाऱ्याकडून निघालेल्या पत्रकाचा नि मजुराच्या संपाचा तो मूग गिळून स्वस्थ बसण्यापलिकडे कांहींहि विचार करीत नव्हता.

पुढं होणाऱ्या त्राग्याची आम्हांला कल्पना होती. आम्ही ज्या बंड-खोरपणानं मजुराना घेऊन मागणीची जाणीव करून देणार होतों तीत मोठमोठ्या राजकीय आकांक्षा भरल्या होत्या आणि भांडवलदाराचा नि सरकारचा ती पुरी करण्यात सारखाच तोटा होता.

मुंबईत एक मोठी महागाई परिषद भरविण्याचा विचार ठरला गेला. त्यांतूनच या मागणीची एक योजना नि विरोधी भांडवलदारी सत्तेला आव्हान देण्याची योजना निश्चित केली गेली.

सुरू होणाऱ्या १९४० च्या वर्षाचा पहिलाच दिवस. माझ्या नयना पुढें क्रातिकारक दृष्टीनं रम्य पण ध्येयवादानं भयाण अशी स्वप्ने निर्माण करणारे प्रसंग कल्पनेत तरळत होते. रात्रंदिवस कामगार कार्यकर्त्यांच्या मदतीनें कामगार मैदानावर ३० हजार मजुराना पुरेल एवढा पेन्डॉल बाधण्याची मी व्यवस्था करण्यात गुंगून गेलो होतो. एवढंच नव्हे तर पेन्डॉल बांधण्यापासून तों तेथे सभेची व्यवस्था ठेवण्याचं काम माझ्यावरच सोपविण्यात आल होतं.

तर दुसरे कार्यकर्ते प्रचार करण्यात गुंतून गेले होते. हस्तलिखित पोस्टर्स मुंबईभर योग्य योग्य ठिकाणी सिनेमाच्या जाहिरातीप्रमाणे डकविलीं जात होती. रस्त्यावरचे कोपरे सकाळी नि संध्याकाळी लाल लाल झेंड्यांनी नि जमलेल्या लोकाच्या एक समूहानं भरले जात होते अन् त्यातून एखाद्या कार्यकर्त्याचा आवाज उंचावला जात होता तर दुसरीकडे कोणत्याहि सभेत किवा गर्दीच्या ठिकाणी नि रेल्वेच्या फाटकाबाहेर पत्रकांचा अनाहूत संचार चाललेला दिसत होता.

शेवटी तो भव्य पेन्डॉल पूर्णपणे बाधला गेला. पेन्डॉलमध्यें येण्याकरितां तीन मोठी प्रवेशद्वारं बाधली गेलीं आणि त्याना परशुराम जाधव पापा मिया, भागुजी वाघमारे या हुतात्म्याची नावं ठेवण्यात आली. मुख्य प्रवेशद्वारावर एक उंच मोठा हातोडा व कोयता उभारण्यात आला होता, आणि दुसऱ्या दारावर कॉंग्रेसचं निशाण लहरूं लागलं होतं.

कॉम्रेड बॅनर्जी वेळेवर येऊं शकले नाहींत. कॉ. युसफ अध्यक्ष म्हणून बोलावले गेले.

महागाई परिषद आणि तेथे जमलेले सारे संघटित कामगार बघून एकमेकाची मनं कशीं समाधानानं भरली होती आणि त्याच समाधानातील मनातून निघालेल्या भाषणाच्या ज्योति. त्या ज्योतीच्या प्रभेंतून असंख्य कामगाराना त्यांच्या जीवनाला अनुकुळ असा एक नवीन मार्ग दिसला.

एक मोठा कार्यक्रम! क्रान्तीच्या आधी क्रान्तीची तयारी कशी करावी याचा प्रयोग, कॉंग्रेसच्या बैठकी अन् त्यांतून निर्माण होत असलेली एक झुंज आणि तिलाच साथ देण्याकरितां आम्ही आखलेला कार्यक्रम केव्हढा उदात्त होता!

परिषद चालू असतांना माझ्या मनात कितीतरी विचारांची कालवा-कालव चालली होती. असा, रूपमती आणि डेन कामगार कार्यकर्त्यांच्या मोहरक्या बनून बसल्या होत्या. सारे विद्यार्थी कार्यकर्ते व्याख्यात्याच्या भाषणानन्तर आवाज पुकारण्यात गढून गेले होते.

जीवन, मणीबेन, संजीव, अजय, वर्दे वगैरे सारे माझे सहकारी व्याख्यात्याच्या मागच्या बाजूला गोल रागेनं मांडलेल्या खुर्च्यांत त्या लाल निशाणावर दृष्टि रोखून कोणत्या तरी विचारात गर्क झाले होते.

कॉ. युसुफच्या भाषणानन्तर खरं म्हटलं तर कॉमरेड मालाणकर बोलणार होता. पण माझ्या पाठीवर थाप देत अजित उठला आणि कॉ. मालाणकरच्या नि अध्यक्षांच्या कानात कांही तरी सागून त्यानं मॉयक्रोफोन समोरची जागा पटकावली.

तो उभा राहिला. अगदी शात. त्याचं ते अगदी साऱ्या लोकासमोर शांत उभं राहणं म्हणजे सूर्यानं ढगा आडून बाहेर येण्यासारखं मला वाटलं आणि त्याच्या तोंडून बाहेर पडणारी वाक्यें ऐकून कुंद वातावरणात उन्हाच्या प्रखरतेची साक्ष मला झाली. तो बोलूं लागला—

"बंधूंनो,

युद्धाच्या ज्वाळा उफाळल्या आहेत आणि त्याबरोबर आपल्या हिंदी स्वातंत्र्याचा आवाज उंच होत आहे. आतां वेळ अगदीं नक्की जवळ येऊन ठेपली आहे. कॉंग्रेस तिकडे पाऊल पुढे सरकवणार आणि काही तरी मोठा कार्यक्रम देशासमोर ठेवणार हें नक्की झालं आहे. माझ्या बंधूनों, कॉंग्रेस हीच आपणा सर्वांना आघाडीवर आणणारी नि मार्ग दाखविणारी संस्था आहे. हो असेल पण कामकरी बंधूंनो, मी सांगतोंच कॉंग्रेस खरीखुरी तुमची आहे. तिला जोरकस बनविणं हें तुमचं काम आहे. आपण न्याय्य रीतीनं मालकशाहीला, ही प्रचंड सभा भरवून आव्हान देत आहोंतच. काल काढलेल्या आपल्या पुढाऱ्यांच्या जाहीरनाम्यानं जर ही झोटिंगशाही नाहीं वळली तर आपली संघटणा जोरांत आहे. आज महागाईमुळं आपलं सर्वांचं जीवन किती दुष्कर बनलं आहे? आणि अशा वेळेस आपण एखाद्या ओझं घेऊन चाललेल्या बैलाप्रमाणं मालकांचे

मार खात आणि त्याच्या कंजूषपणानं दिलेल्या अन्नानं जिणं जगविण्यात कोणता स्वर्ग आहे ? स्वर्ग तिथं आहे...हा फडकणारा लाल झेंडा तो आपल्याला दाखवीत आहे. गगनातला फडफडणारा लाल रंग...जमिनीवर आल्याशिवाय—आतांची आपली सर्व तयारी त्या दिवसा करता आहे. आज नाही उद्या, उद्या नाहीं परवा, परवा नाही काही तरी वर्षांनी का होईना ह्या मार्गानं किवा त्या मार्गानं आपलं राज्य ह्या पृथ्वीतलावर स्थापूंच स्थापूं. घ्या. शपथ घ्या की, आपण पुढं माजविणाऱ्या आन्दोलनावर आपले कौटुंबिक, स्वार्थी आणि सर्व तऱ्हेचे आनुवंशिक दोरखंड खटाखट तोडून आपण ह्या भाडवलशाहीला हातोडा नि कोयत्याचं आव्हान देऊं. आपल्या पत्रकानं, जाहीरनाम्यानं किवा शिष्टाईनं जर ते वठणीवर आले नाहीत तर...तर चला. चला निश्चय करा कीं आपण आपलं संपाचं प्रचंड हत्यार उपसूं आणि त्याला पणास लाऊन आपली मागणी आपण पुरी करून घेऊंच घेऊं."

अजितला, महागाई परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या एका सभासदाकडून वाढत चाललेल्या भाषणाला आळा घालावा म्हणून मागे खेंचण्यात आलं. अजित थोडासाच नंतर बोलला. त्याचं ते बोलणं वाजंत्रीं वाजल्यानंतर काही वेळानं तबल्यावर थाप मारावी त्याप्रमाणं मला वाटलं.

× × ×

त्याच दिवशीं रात्रीं साऱ्या कार्यकर्त्यांची एक तातडीची बैठक बोलावली होती. रात्रींचे नऊ साडे नऊ वाजले होते. कामगार मैदानावरच मी काहीं कर्त्यांशीं बोलण्यात इतका गढून गेलो होतो कीं सगळीकडे शातता झाली याचं मला भानच राहिल नाहीं. एक कार्यकर्ता मला म्हणाला, 'पण हाटे, सागा ना आता कार्यकारी मण्डळात तुम्ही आम्हा कामगारांकडून कोणते मुद्दे माडणार आणि आक्रमक धोरणाबद्दल काय योजना आखणार !' मीं त्याना बजावीत म्हटलं, 'बैठकींत आपण काहीं नियम पास करून घेतलेत तरी पण कामगारांची बाजू अंगावर घेण्याची जबाबदारी तुमच्यावरच आहे. आता तुम्ही कामास लागा. झाडून साऱ्या कामगारांची नोंदणी युनिअनच्या ऑफिसात झाली पाहिजे. म्हणजे आप-

त्याला द्रव्यसाह्यहि करता येईल नि त्याचबरोबर संघटणेची मर्यादाहि ओळखतां येईल. आणि नंतर आपल्याला पुढें आक्रमक पाऊल टाकण्यास जोर चढेल.'

तितक्यात माझ्या रोखानं असा आणि कॉ. वर्दे येताना दिसले. त्या भव्य मंडपात आम्हा चौघाशिवाय कोणीच नव्हतं. असा जवळ येताच म्हणाली, 'म्हणजे, हें काय ? हाटे, तिथं G. K. U. मध्यें कोरम तर फूल भरला आहे. आणि सर्वजण तुमचीच वाट पहात आहेत. चला ना.'

कॉ. वर्देला मी चालण्याबद्दल म्हटलं पण त्यानं त्याच पेण्डॉलमध्यें रेल्वे कामगार युनिअनचे काही कॉमरेड्स बोलाविले होते आणि दुसऱ्या दिवशी रेल्वे कामगाराची रेल्वे महागाई भत्त्यासंबंधी प्रचंड रॅली भरविण्याचा त्याचा बेत होता. त्या बाबतीत विचारविनिमय करण्याकरितां तो तेथेंच थाबला. माझ्याबरोबर बोलणारे तीनचार कार्यकर्ते, असा नि मी ट्रॅमच्या रस्त्यापाशी आलो. ते सर्व कार्यकर्ते तेथून आपआपल्या घरी निघून गेले आणि मीं तो सामसूम रस्ता असाबरोबर ओलाडला. रस्त्यालगत युनिअनच्या जिन्यातून चढताना असाचा मांसल दंड माझ्या दंडाला कितीदा तरी चाटून गेला पण त्याकडे दुर्लक्ष करून मीं तिला म्हटलं, 'असा आतां रात्र बरीच झाली आहे. तूं घरी जावंस हेंच उत्तम.'

पण ती त्यावर अगदी शातपणें म्हणाली, 'अहं, जयंत, बाबा गेले आहेत कलकत्त्याला, त्या दिलीपबरोबर. अन् झोपण्याचं काय ? आता आपल्याला अशा कितीतरी रात्रि उजाडतील की त्याना न जुमानता आपण आपली कार्यसेवा पुढं ढकलली पाहिजे. इथं आपला वेळ मोडणार तरी किती आणि जरी वेळ झाला तरीपण तुम्ही पोचवालच की नाही घरी ?'

असानं दिलीपचा सबंध आणल्याबरोबर मी त्या मागच्या स्मृतीनं चमकलों. तिच्या चेहऱ्यावर माझी नजर गेली. तिचा गुलाबी चेहरा थंडीनं झोंबणाऱ्या वाऱ्यामुळं मोहक दिसत होता अन् मी तिला काहीं तरी उत्तर देणार तोंच दुसऱ्या मजल्यावरचं ऑफीसचं दार माझ्यापुढं येऊन ठेपलं.

माझे सारे सहकारी तेथं बसले होते. एखाद्या आंगठीत सारे हिरे खुलून दिसावेत तसे ते त्या प्रयोगशाळेंत एक एक खुलून दिसत होते.

# १३

आठदहा दिवस झाले–अजित नंदिनीस घेऊन आला होता. पीत वर्णाची, साधारण स्थूल, नाकी डोळी नीटस्, रुंद गाल, अन् अर्ध्या गाला-पर्यंत आलेला केशसंभार, डोळयात सदोदित तरारणारें पाणी, मुद्रेवर रागाट भाव, कुंकवाच्या ऐवजी साधारण उभट हिरवी खूण अन् भरीव गच्च वक्षः-स्थळ पाहता अजितचा नि तिचा जोडा योग्य दिसत नव्हता. साधारण ती पुरुषद्वेष्टी दिसत होती. तिच्या बोलण्यात नेहमी अहंकाराची भाषा प्रतीत होत होती. 'स्त्रियाच्या सुधारणा स्त्रियाच करतील. येवढी नको काहीं पुरुषाची पत्राज !' हें वाक्य तिनं अगदी पहिल्याच दिवशी माझ्या आणि विभासच्या समोर उद्गारल होतं. ती दोघे गेल्यानतर विभास म्हणाला होता 'ही मुलगी तर भलतीच फटाकडी दिसते.' अन् मी विभास वर्देच्या बोलण्या-वर हंसून म्हणालो होतो, 'मुलगी नको म्हणूंस–स्त्री म्हण. परवा फोर्टच्या 'आयडियल' मध्ये अजितकडून तिच्याशी विवाह रजिस्टर झाल्याबद्दल 'फिस्ट' उकळलेली विसरलास वाटतं! मुलगी लग्न झाल्यानंतर स्त्री बनत असते.'

'हो, अन् स्त्री बनल्यानंतर माता बनते असंच ना !' आणि विभा-सच्या ह्या विनोदावर आम्ही खोः खोः करून हंसलों होतो.

× × ×

एकवीस जानेवारीला रामगड कॉंगेसच्या निवडणुकीची मोहिम जोरात सुरू केली होती. स्ट्रीट कॉर्नर मिटीगवर कम्युनिस्ट उमेदवारानाच मतं मिळालीं पाहिजेत असा प्रचार चालला होता. पोलिग स्टेशनवर आम-चेच कार्यकर्ते राखून ठेवले होते. पण इतकी जरी जय्यत तयारी करून ठेवली होती तरी पण मजुराच्या गटात रॉयवादी आपलं संधान साधूं पहात होतेच. संजीव नि अजयनं मागें जी शंका प्रदर्शित केली होती ती खरी ठरू पहात होती. काही कामगारात धरसोडीनं वागणारे पुढारी होते. मजुरांच्या हितापेक्षा दुफळीचं तत्त्वज्ञान त्याना जास्त अवगत होतं. पण त्याला कांहीं इलाज नव्हता. आजच्या युगात जाहिरातबाजीची जी प्रथा व्यवहारांत माजली जात आहे तीच प्रथा राजकारणातहि धुडगूस घालूं

लागली आहे. पण जातिवंत सोनं पारखायला कांही कसोटी लागत नाहीं. आमचाच विजय होईल अन् आमचेच जास्त प्रतिनिधि निवडून येतील, इतकी सर्व व्यवस्था आम्ही करून ठेवली होती.

× × ×

ज्या दिवशीं कॉंग्रेसचं इलेक्शन् होतं त्या दिवशीं आमच्या साप्ताहिकाचा लेनिनच्या मृतदिनानिमित्त खास अंक निघणार होता. त्या वेळीं संपादकीय ऑफिस वेगानं काम करण्यात गढून गेलं होतं. जीवनकुमार स्फुटें लिहिण्यात, मणिबेन चित्रं काढण्यात, अजित लेख लिहिण्यात, नंदिनी प्रुफं तपासण्यात नि प्रत्येकाशी वादविवाद करण्यात तर डेन आणि संजय बाहेरच्या बातम्या आणून देण्यात मग्न झालेले दिसत होते. आणि सर्व गोष्टींची संपादणी करण्यांत मी गढून गेलो होतों.

× × ×

सकाळीं झोंपेतून मी जरा आळसानेंच उठलों होतों. कॉंग्रेस उमेदवारांच्या निवडणुकी झाल्या होत्या अन् कालच संध्याकाळी आमच्या अंकाच्या प्रति मोटारींतून निरनिराळ्या ठिकाणी रवाना झाल्या होत्या.

सारी रात्र मीं मधुर स्वप्नात घालविली होती. रात्रीं डेन निघून गेल्यानन्तर तिच्या येण्याची नकारात्मक बोचणी आणि रोष यानी तिनं आपल्या मनातील स्त्रीसुलभ द्वेष व्यक्त केला होता. ती स्मृति साऱ्या रात्रभर बेभान करीत होती मला. तर असावरीची ती मुग्ध मधुर मुद्रा नि तिचा माझ्या विषयी आस्थेवाईक हावभावाचा गोड चेहरा सारखा पुढे पुढें येऊन उगीचच माझ्या विचारावर तरग उठवीत होता.

माझ्या शर्टाकडे माझी नजर गेली. त्यावर डेनच्या केसाचे ते तेलकट डाग मला दिसले. त्याचा मंद सुवास अजूनहि माझं हृदय झंकारीत होता.

मी उठलों, उभा राहिलों. प्रेमाच्या स्वप्नरंजनापेक्षा मला कार्यतत्परता अधिक आवश्यक भासूं लागली.

परीक्षेचे पेपर लिहून झाल्यानन्तर विद्यार्थ्यांचा तो दिवस—एखादं सामाजिक किवा राजकीय सभासंमेलन संपल्यानन्तर चालकांची ती वेळ

किंवा खास अंक बाहेर पडल्यानन्तर संपादकीय मंडळाची ती स्थिति किती रम्य असते, ह्याची कल्पना प्रत्येक व्यक्तीला असेलच. अशाच आनंदाचा मी मनमुराद उपभोग घेत होतो.

पण कालच जीवनकुमार म्हणाला होता, ‘जयंत, त्या बिटीया मिलच्या संपाचा निकाल लावल्यानंतर तुम्ही जसे निर्धास्तपणें कांहीं दिवस घरीं मजेत घालविले तसं आता नाही चालायचं हं. सकाळीं तुम्हांला आलंच पाहिजे माझ्या घरी. अजित नि सतीशहि येणार आहेत त्या वेळेला इथं.’

× × ×

रॉयल ऑपेरा हाऊसच्या बस स्टॅन्डपाशी मी उभा होतो. आजचा माझा पोषाख जर बालेनं बघितला असता तर ती म्हणाली असती, ‘जयत भलताच खुषीत दिसतोस हं तूं आज.’ मी पांढऱ्या खादीची पॅन्ट नि शर्ट घातला होता. पायात पठाणी सॅन्डल्स अडकविल्या होत्या. केस धुवून पुसून अगदी नीटनेटके उलटे फिरविले होते. दाढी करण्यात विशेष लक्ष घातलं होतं. टॉयलेटींगकरताहि वेळ दिला होता. ह्या सर्व गोष्टी झाल्या होत्या म्हणून मी अगदी समाधानी दिसत होतो.

बस यायला बराच अवकाश होता.

माझी नजर सहज शेजारी गेली. असावरी माझ्याकडे मिश्कीलपणें बघत उभी होती.

बोलण्याला सुरवात करीत ती म्हणाली, ‘म्हटलं बघूं या कुठवर तंद्री लागते आपली ती!’

‘कसली तंद्री लागायची असा! मी थांबलो आहें बस करतां अन् अजून तर ती काही येत नाही. आणि तूं इतक्या उशीरा कॉलेजात जात आहेस अन् निराळ्या रस्त्यानं?’

‘होय. मी कधी कधी पहिल्या तासाला बुट्टी देतें आणि इथल्या बसनं जातें. इथून बसमधून जाण्यात फारच मजा वाटते मला. आली तशी लहर कीं मी आपली जातें इथून.’

‘अरे पण ही बस आलीच. आपण भेटूं नंतर.’ असं म्हणत मी पुढं निघणार तोंच माझा हात मागें ओढीत तिनं म्हटलं, ‘थांबा ना! मला बोलायचं आहे तुमच्याशी काहीं. खोलीवरच येणार होते मी तुमच्या.

नाहीं तर काय ? जेव्हां जेव्हां तुमच्याशी बोलायला जावं तेव्हां तेव्हां सदा न् कदा आपली माणसाची गर्दी तुमच्या भोवती ! '

'हो, पण असं काय काम आहे इतकं खाजगी ? भेट की संध्याकाळीं घरीं. मी असेन घरींच. येच नक्की. ' असं म्हणत नि एकीकडे बसच्या फूटबोर्डवरील लोखंडी दाडा हातात धरीत मी बस गांठली.

आता माझ्या मनाची पुन्हा विचित्र स्थिति झाली. पुन्हा मला रात्रींच्या डेनच्या वागणुकीची आठवण झाली. आता असाच्या भेटीत त्याचेच निनाद ऐकूं आले. संथ वाहणाऱ्या पाण्याच्या प्रवाहावर लहान लहान मासे उगीचच वर येऊन नि तुषार उडवून त्या पाण्यावर तरंग उठवितात. तसेच लोकप्रियता मिळविलेल्या व्यक्तीच्या आयुष्यातहि अशीच लहान नि सामान्य माणसे—ज्यान्ना काही प्रियता हवी असते ती—त्याच्या भोंवताली येऊन त्याच्या आयुष्यात एक थाप देतात, त्या माणसांच्या मनात निष्कारण विचाराची वलये उठवितात.

बस जोरात धावताच माझ्या मनात एक विचार चमकला. दिलीप ! त्या रात्रीच्या असाच्या नि माझ्या भेटीची त्यानं सर्व माहिती डेनला दिली आणि या कारणावरून तिनं किती त्रागा केला रात्री. तसंच..... का कुणास ठाऊक पण असाच्या बाबतीत तिच्या बापाशी दिलजमाई करून त्यानं सिनेमा-तारका म्हणून असाला ओढलं तर...उगीचच हे विचार माझ्या मनात गर्दी करूं लागले. त्या विचाराना थाबविण्याकरता मी दिलीपची एकदा भेट घेऊन टाकण्याचा पक्का निश्चय करून टाकला.

× × ×

जीवनकुमारच्या इमारतीचे जिने चढताना मला वाटलं आज आम्हां सर्व चालकाची अगदी मजा आहे. सर्वांच्या चेहऱ्यावर समाधान झळकत आहे आणि आज या सर्व गोष्टीला साजेसा कार्यक्रम आखलाच पाहिजे एखाद्या करमणुकीचा. ह्या विचाराच्या वेगातच मी जीवनच्या खोलीत शिरलों.

अन् पाहतो तों काय ? ज्याची कल्पनाच मनाला स्पर्श करूं शकणार नाहीं अशा देखाव्यानं मी एकदम चमकलों. आल्यापावलींच परत जावंसं वाटूं लागलं मला. पण...मी संदेहात पडलों. जीवननं माझ्याकडे बघितलं

पण अगदी थंडपणानं. मला वाटतं त्यानं मला जाण्याची खूणहि केली असावी नि मी परत जाण्याच्या बेतांतहि होतोच. या वेळात त्या पाढऱ्या पोषाखातल्या पिवळ्या पगडीच्या व्यक्तींनीं माझ्याकडे बघितलं. पुढें सरकत त्यातला एक इन्स्पेक्टर म्हणाला, 'प्लीज जरा थाबाल काय? आणि आपलं नाव? याच्याशी आपलं काय काम आहे तें सागाल काय?'

येऊं नये तो प्रसंगच बेतल्यावर मीहि त्याला तोंड द्यायला तयार झालों.

'हो पण आहे तरी काय ही भानगड कळूं तर द्या.'

'त्याच्यावर बनारसमधील कम्युनिस्टवादी गटात आक्षिप्त वाङ्मयाचा प्रसार केल्याबद्दल संशय घेण्यात आला आहे व त्याप्रमाणे आज त्याच्यावर 'सर्च वॉरन्ट' बजावलं जात आहे.'

लगेच दुसरा एक लठ्ठ लठ्ठ अन् चेंडूसारख्या आकृतीचा इन्स्पेक्टर माझ्याकडे येत म्हणाला, 'घाबरू नका. आम्हाला इथं काहीच सापडत नाहीं आणि तसल्या प्रकारचं काही सापडल्याशिवाय याना आम्ही पकडणार तरी कसे?'

मी मुद्दामच खवचटपणं त्याना म्हणालो, 'म्हणजे मग तुम्ही नीट तपास न करताच एखाद्याच्या अब्रूवर नि खाजगी बाबतीत गदा आणता तर?'

'मिस्टर, काही झालं तरी आम्ही सरकारी नोकर. हुकुमाचे ताबेदार. आला हुकूम बजावला ताबडतोब.'

जीवनकुमार टेबलावरून उठला. त्या दोघा सी. आय. डी इन्स्पेक्टरपुढें उभा रहात म्हणाला, 'बरंय मिस्टर, आटपा बघूं तुम्हाला काय काय पाहिजे ते. मला पुष्कळ कामं आहेत आणि सकाळचा सारा वेळ तुम्ही घेऊन बसलात. तुम्हाला हा गठ्ठा पाहिजे ना? घेऊन जा. पाहिजे असतील ते कागद घेऊन जा. पण आता तुम्ही त्वरा करा.'

त्यातला पहिला इन्स्पेक्टर चिरूट ओढीत म्हणाला, 'ते मी जाणतों. तुमच्याकडे सकाळपासून जीं जी माणसे येत आहेत त्यावरून तुमचं पुढारीपण सिद्धच होत आहे मुळीं. पण प्रश्न पडलाय आम्हाला त्या कारस्थानाचा.'

मी त्याच्या अगदीं पुढें होत म्हणालों, 'तुमचा प्रश्न तुम्ही सोडवा पण तो सोडविताना आम्हाला कां त्रास? आणि प्रश्न निर्माण करणाऱ्या त्या मालकाची आमच्या घरांदारांवर वरवंटा फिरविण्याची ही काय अजब रीत!'

शेवटीं तो लठ्ठ गालाचा इन्स्पेक्टर माझ्या पाठीवर थाप मारीत म्हणाला, 'आताशी तुम्ही लोक आम्हाला फारच त्रासदायक झाला आहांत. आम्हाला घरी धड विश्राति मिळत नाही नि या त्रासातून सुटका होत नाहीं.'

आणि जीवनकुमार अगदी त्रासून म्हणाला, 'आणि ती होणं शक्य नाहीं. तुमच्यासारखे विघ्नसंतोषी लोक जोंपर्यंत या राज्ययंत्रांत आपल्याच प्रजेचे पैसे घेऊन त्यानाच जाच देत आहेत तोपर्यंत तुम्हाला फार कष्ट नि बैलाचं जिणं.... '

हें ऐकताच त्यातला रोडका इन्स्पेक्टर रागावला नि काहींसं पुटपुटला पण तो लठ्ठ माणूस मिश्किलपणानं हसत गॅलरीत गेला. त्यानं खालीं उभ्या असलेल्या पोलिसांना शीळ दिली. ते वर आले आणि गठ्ठे व कागद काढून त्यांचा पंचनामा करण्यात आला. नंतर ते भारवाहक निघून गेले. आणि तो लठ्ठ इन्स्पेक्टर आमच्याशी हस्तान्दोलन करून घेत, 'Well, young men 'good bye' for the present.' असं म्हणत निघून गेला. त्याच्या पाठोपाठ तो क्रुद्ध इन्स्पेक्टर तोऱ्यात बाहेर पडला नि तो निघताच मी दार खाडकन् बंद करून त्याच्या बद्दलचा तिरस्कार व्यक्त केला. त्याच्याबरोबर बाहेर जमलेल्या बघ्याची नि आमच्या खोलींतल्या भानगडीची ताटातूट केली.

मीं आरामखुर्चीवर अंग टाकीत नि एक थंड निःश्वास सोडीत म्हटलं, 'जीवनकुमार, आतां आपल्याला विशेष दक्षता घेतलीच पाहिजे नाहीं? कारण ते आपल्या साप्ताहिकाच्या फायलीचा गठ्ठा घेऊन गेले आहेत!'

तो खोलींत येरझारा घालीत नि मोठ्या लाइफ मिररपुढें कांहींसा विचारतंद्रींत उभा रहात म्हणाला, "No worry, Comrade, everything has been fixed up already. ते येतांच मी बेनला

बाहेर उभं केलं होतं आणि अजित नि सतीशला हें सारं कळून त्यानीं त्या प्रमाणें सर्व व्यवस्था करूनहि टाकली असेल."

मी जागेवरून उठत त्याला म्हणालों, 'बरं तर मग मीहि चलतोच आतां पुढं. जेवण वगैरे उरकल्यानन्तर तुम्ही याच ऑफिसमध्यें.'

'बरं तर तुम्हांला गेलंच पाहिजे तिथं. पण मी काहीं लौकर येऊं शकणार नाही तिथ. मी आज संध्याकाळपर्यंत माझी खोली बदलणार आहें. आतां पहिले काही दिवस मी बेनकडेच जाऊन राहणार आहें. तेवढ्यात या पोलीसाचा ससेमिरा तरी वाचेल माझ्या पाठीमागचा!'

× × ×

आता मी वाळकेश्वरच्या बस स्टॅन्डपाशीं उभा राहिलों होतों. ती भर दुपारची वेळ होती. रस्ता वहात नव्हता. समोरच्या सागराला भरती आली होती. त्यामुळें सूर्याचा प्रकाश जास्त जास्त प्रखर भासत होता. एका बाजूनं मलबार हीलवरच्या झुलत्या बगीच्यावर जाण्यास वाट होती तर बाजूच्या गोल वर्तुळात जवळच्या शाळातून सुटलेली मुलं मधल्या सुटींत आनंदानं बागडत होती.

समंजसपणाचा विचार करण्याकरितां मी त्या विल्सन हॉटेलचा आसरा घेतला. जीवनची आज जी स्थिति झाली आहे ती उद्या आमची कशावरून होणार नाही? कदाचित् आजच त्याचा संभव आहे. पण मीं माझ्या खोलीवर जाऊन सर्व निस्तरायचं म्हटलं तर अधिक अवघड. मीं चहाचा अर्धा कप घशात ओतला. गडबडीनं सिगारेट शिलगावली आणि बस जेव्हां अजूनहि येताना दिसेना तेव्हा पायी पायींच संपादकीय कचेरींत जाण्याचा विचार केला.

ऑफिसच्या दारावर बराच वेळ टक् टक् केल्यानन्तर कुठं दार उघडलं गेलं. नंदिनी, अजित, डेन व बेन मला तिथं दिसल्या.

मी जरा संत्रस्तच झालों होतों अन् ह्या तिघा तरुणीना ऑफिसातून घालविण्याची युक्ति योजीत होतो. कारण जीवन, अजित नि मी मिळून आम्हाला, झालेल्या प्रकरणावर अन् पुढें होणाऱ्या अदमासावर बरंच बोलायचं होतं.

मी डेनला हाक मारीत म्हटलं, 'डेन, ही घे किल्ली माझ्या खोलीची.

तुला सर्व समजलंच आहे तर आताच्या आता जाऊन खोलीतलीं सारीं कागदपत्रें नीट तपासून त्याप्रमाणें त्याची वाट लाव आणि सर्व इतक्या तांतडीनं कर की तिथं कोणी आलं तर काही सुद्धा सुगावा लागतां कामा नये.'

बेन माझ्याजवळ येत मध्येच विचारूं लागली, 'जयंत, तुम्ही जीवनकडूनच येत आहा ना? पण काय हो त्यानीं जीवनच्या खोलींतला तो मोठा आरसा तर बघितला नाही ना मागच्या बाजूनं?'

'वा: अल्लाउद्दीनच्या जादूच्या दिव्यासारखा काहीं आरशाचा प्रयोग होता की काय? मला जर तसं कळलं असतं तर मींहि घेतला असता त्याचा प्रत्यय.'

'नाहीं हो. ह्याटे तसं नाही म्हणत मी. आरशाच्या पाठीमागच्या फळयावर कार्यकर्त्यांचे, चळवळीशी संबंध असणाराचे पत्ते नि संकेतस्थळाचे नकाशे रेखाटण्याचा त्याना नाद आहे अन् त्या टोळधाडीच्या हातांत तो आरसा गेला की आटपलं काम सर्व!'

बेनच्या बोलण्यावर मला उत्तर देण्याची संधि न देतां डेन म्हणाली, 'आमच्या जिमलाहि तशीच संवय आहे बरं का. सारी काहीं तसल्या प्रकारचीं कागदं गादींतल्या आतल्या कापशीत तो ठेऊन देतो. आता मी गेलें म्हणजे गादीच बघावी लागेल काढून.'

आणि आतापर्यंत न बोलणारी नंदिनी म्हणाली, 'आमच्या ह्या अजितला तर बाई एक विचित्रच खोड आहे. जी कांही महत्त्वाची कागदं असतील तीं दे आपल्या हक्काच्या माणसाजवळ अन् म्हणतो काय की, 'स्त्रियानी आपल्या कोन्या किंवा नेसलेल्या पातळाच्या घडीतून तीं वागवावी म्हणजे कुणाचंच जात नाही तिकडे लक्ष!' जणुं काय स्त्री म्हणजे धोक्यातून सावरून धरणारी वस्तुच वाटते यांना नेहमीं.'

अजित आम्हा सर्वांपुढें येत म्हणाला, 'जयंत काय ऐकत बसला आहेस यांचीं गाऱ्हाणी? संपणार नाहीत या स्त्रियांच्या आपल्या प्रियकरां-बद्दलच्या अर्थविहीन तक्रारी!'

तितक्यात टेलिफोनची घंटा बाजली. मीं रिसीव्हर हातांत घेत म्हटलं, 'हं हॅल्लो, कोण? सतीश! हं काय रे काहीं विशेष—म्हणजे आजचा

'ज्वालेचा' अंक शेवटचाच म्हणतोस ...? जीवनबद्दल सर्व समजलं ना तुला?...हो...आहे. अजित येथेंच...अंहं. त्यानं काही सांगितलं नाहीं मला...काय तुझ्या खोलीवर यावं म्हणतोस...? बरं येऊं नक्की.'

मी रिसीव्हर खालीं ठेवीत डेनला म्हणालों, 'डेन, तूं आपली कामगिरी बजवायला जा बरं.' अन् बेनला उगिचच थाप ठोकून देत म्हटलं, 'तुम्हाला जीवनने बोलावलं आहे आताच.'

डेन नि बेन हातात हात घालीत नि काही तरी विनोद करीत निघून गेल्या. पण मला अजितचा चेहरा चिंताक्रांत दिसत होता.

दुपारचे तीन वाजेपर्यंत हा गोंधळ चालला होता. मला भूक अगदीं तीव्र लागली होती आणि ऑफिसला सुट्टी असल्यामुळे पोऱ्याहि जागेवर नव्हता.

'अजित, अगोदर मला पोटाची तर काही सोय पाहूं दे. मी खालच्या हॉटेलमधून कांहीं तरी आणतो खायला. त्यावर आपण ताव मारूं अन् मग ठरवूं पुढचा कार्यक्रम.'

'कार्यक्रम' ह्या शब्दावर जोर देत काहींशा चिन्तेनं नि काहींसं हास्यानं नंदिनीकडे बघत अजित मला म्हणाला, 'जयंत, रिगलचा पहिला शो गाठूं या.'

मी जरा चमकलोंच अजितच्या ह्या नव्या कार्यक्रमामुळें. पण नंदिनी या अजितच्या सूचनेवर खूष झालेली दिसली. ती हंसतच म्हणाली, 'खरंच जाऊं या सिनेमाला, नाही? नाहीं तर काय राजकीय नि सामाजिक आदळच पुष्कळ. कुठंच काही जीवनविषयक कलाभास नाहींच तुमच्या ठिकाणी.'

मला नंदिनीचं तें तोऱ्यात येऊन बोलण्याचं नवल वाटलं आणि मी खाली हॉटेलमध्यें ऑर्डर देऊन वर येऊन बसलो. तरी अजित नि नंदिनीच्या नेहमीच्या वागणुकीचा अस्पष्ट संवाद माझ्या पुढून निसटत होता.

## १४

काळ्या घोड्यापाशी ट्रॅम जाईपर्यंत अजितचं वक्तव्य ऐकण्यात मी गढून गेलों होतों. ती तीन साडेतीनची वेळ असल्यामुळे फोर्टमध्ये ऑफिसेस सुटण्याची धास्ती नव्हती. शो-रूम्स नि दुकानं खुल्या मनानं जाणाऱ्या येणाऱ्याची मनं ओढून घेत होती. एकीकडे आजितचं म्हणणं मला ऐकून घ्यावं लागत होतं तर दुसरीकडे नंदिनीला प्रत्येक इमारतीकडे बोट दाखवून तिच्या प्रश्नाचीं उत्तरे द्यावी लागत होती. मोठमोठ्या इटालिअन नि जर्मन कंपन्याना कुलुपें घालण्यात आली होती. मालाची निर्यात चालू होती.

फोर्टमध्ये अजितला कधीच करमत नसे. तसा तो पुष्कळदा अंगात पिवळा नेहरू शर्ट नि संजाबदार पायजमा घालून, कातडी बॅग हातात घेऊन आणि कपाळावरचे घामाचे ओघळ पुशीत असताना मी त्याला फोर्टमध्ये नेहमी बघत असे. पण त्याला जर प्रामाणिकपणे विचारलं तर तो म्हणत असे, ' ही वस्ती म्हणजे साम्राज्यशाहीनं भाडवलदारांशी केलेली गट्टी आहे. येथे पैसे मिळविण्याचा नि लोकाना नाना तऱ्हेचें आमिष दाखविण्याचा चंग बांधलेल्या लोकाचा स्वर्ग आहे. '

' रिगल सिनेमा म्हणजे सोजिराचा फुकट सिनेमा पाहण्याचं ठिकाण. ' असं संजय नेहमी म्हणत असे.

ह्या वेळी आस्ट्रेलिअन फौजा थारेपालट करण्यासाठी हिंदुस्थानात आल्या होत्या अन् हिंदुस्थानातल्या फौजा आघाडीवर जाऊन माघार घेण्याकरिता निघून गेल्या होत्या. त्या उद्दाम सोजिरानी साऱ्या मुंबईत धुडगूस घातला होता. प्रत्येक वस्तूवर, प्रत्येक वाहनावर, खाद्य पेयावर हक्क गाजविण्यापासून तो रस्त्यावरून जाणाऱ्या निरपराध तरुणीवरहि हक्क गाजविण्याची त्यांची रानटी मजल येऊन ठेपली होती.

चित्रपट सुंदर असेल किंवा नसेल इकडे काही आमचं लक्ष नव्हतं. एक स्पेशल ब्लॉक आम्हीं आमच्या ताब्यात घेतला होता. चित्रपट सुरू होताच नंदिनी तो पाहण्यात रंगून गेली.

अजित माझ्याकडे सरकत म्हणाला, ' आज जीवनची झडती झाली आहे. तिची पाळंमुळं खोल रुजलीं होतीं आधींपासूनच. मी बंगालहून दौरा

करून आलों तेव्हा तुला नव्हतं का सांगितलं कीं, तेथील कम्युनिस्ट गटाचा सरकारनं भलताच जाच करायला सुरवात केली आहे. जसजसा सुभाषचा ' फार्वर्ड ब्लॉक ' उजेडात यायला लागला तसतसा या समाजसत्तावाद्यानी पत्रकाचा नि भाषणाचा अगदीं ताळतंत्र ठेवला नाही. बंगाल आणि बिहारमध्यें बऱ्याच झडत्या मी तिथें असतानाच झाल्या. तें सर्व बघून मीहि इकडे निघून आलो पुढच्या काही संरक्षणाकरिता. लखनौच्या नि कलकत्त्याच्या कम्युनिस्ट गटाकडून सरकारला भलतीच भीति वाटूं लागली आहे. रशिया-फिन्लंडच्या युद्धापासून प्रामुख्यानं काम करणारे कामगार नि विद्यार्थी-पुढारी अदृश्य झाले आहेत अन् कामाचा रगाडा चालवीत आहेत. तीच स्थिति बनारसमध्ये. तेथील विद्यार्थ्यांमध्ये विलक्षण जोर आहे. हिंदी वर्तमानपत्रे तर विरोधी आवाज उंच करीत आहेत आणि एक बंद पडलं तर दुसर त्याची जागा घेत आहे. '

' बनारस, लखनौ, दिल्ली, लाहोर, कलकत्ता, मुंबई नि कराची वगैरे प्रमुख शहरातल्या कम्युनिस्ट गटाची साखळी उकलण्याचा सरकारनें जारीनं प्रयत्न चालविला आहे. जीवनने पत्रव्यवहारात थोडीशी हयगय केली नसती तरी या साऱ्या बित्तंबातम्या काढण्यात सरकार धूर्त आहे. '

' अजित, त्या धूर्त सरकारला वाकडी वाट दाखवायला आम्ही काय कमी धूर्त आहोत? तसं जर पाहिलं तर आपले येथील प्रमुख कम्युनिस्ट पुढारी सोडले तर काही कार्यकर्ते आपल्याकडेहि अदृश्य कामे करीतच आहेत ना. त्यातच आता जीवनने सामील झाल्यास उत्तम. '

' पण जीवन अदृश्य राहून काम करूं शकेल हें शक्य नाहीं किंवा असेलहि. पण तो प्रश्न त्यावर काम सोपविणाराचा आहे. '

' महागाई–भत्त्याच्या परिषदेपासून कामगारांत कार्यतत्परता विजे-सारखी येत आहे आणि तिला जास्तीच तेजस्वी स्वरूप आलं तर पुढाऱ्याना पायबंद घालायला सरकार कमी करणार नाहीं नि मग कामगाराना कार्य करणाऱ्या अदृश्य कार्यकर्त्यांशिवाय आघाडीवर आणण्याला कोणीच शिल्लक रहाणार नाहीं. मी गुप्तपणे काम करूं का अजित? बरं होईल, माझ्या पाठीमागच्या ह्या जबाबदाऱ्या तरी जातील आणि तसं काम कर-ण्यांत जें समाधान आहे त्याचा आस्वाद तरी मला मिळेल. '

‘ जयंत, तें खरं आहे. पण आज ना उद्या तुझ्या संपादनाखालीं चाललेल्या साप्ताहिकाला धोका आहे अन् जबाबदार संपादक या नात्यानं तूं त्याला तोंड द्यायला पाहिजेसच. तूंहि तसा काम करूं लागलास तर सरकारला जास्त चेव येईल आणि मग चांगल्या आणि वाइटाची सरभेसळ होईल.’

‘ अजित, काय घेऊन बसला आहेस चांगलं नि वाईट ? खरं म्हटलं तर चांगलं आणि वाईट यामधील लढ्यात अखेर वाईट बाजूच चांगल्या बाजूवर विजय मिळविते. वाईट बाजूमुळेच चांगल्या गोष्टीला गति मिळते आणि त्या योगेच इतिहास घडून येतो.’

‘ त्या दिवशी चौगुलेकडे आपण सर्व कार्यकर्ते जमलो होतो. आपल्या मोठ्या कम्युनिस्ट पुढाऱ्यानी जी पुढची दिशा आखली आहे तिला साजेसं एक चतुर्थांश कार्यकर्त्यांनी गुप्त झालं पाहिजे. जर्मनी, फ्रान्स अन् ब्रिटन-मध्ये बाहेर जरी साम्राज्यशाहीचं रम्य स्वरूप दाखविण्यात येतं तरी त्यातली खरी गोष्ट अशी आहे की, ते गुप्तपणे कार्य करणारेच आतून साम्राज्यशाही नि हुकूमशाही पोखरायला कारणीभूत झाले आहेत. जयंत, तशाच स्वरूपाच्या महत्तम कार्याची आज आम्हाला जरुरी आहे !’ इतके बोलून अजित खिशातून एक पाकीट काढून माझ्या हातात देत म्हणाला, ‘ बघ सकाळीच माझ्या हातात पत्र आलं नि थोड्या वेळात जीवनची झडती झाली. हे पत्र मला आपल्या हिन्दी कम्युनिस्ट पार्टीकडून आलं आहे आणि त्यात त्यानी मला अशी धोक्याची सूचना दिली आहे की आज संध्याकाळपर्यंत नि पुढचा हुकूम मिळेपर्यंत मी गुप्त झालंच पाहिजे.’

‘ म्हणजे, अजित तूं जाणार आणि मग पुढे काय ? तूं इथेच राहाणार की दुसऱ्या शहरात ?’

‘ ते काही मला सांगता येत नाहीं जयंत. आपण मोकळेपणीं उघड कार्य करताना आपल्याला व्यक्तिस्वातंत्र्य असतं पण गुप्त झाल्या-नंतर त्याची सारी मदार पार्टीच्या वेळोवेळीं होणाऱ्या सूचनेवर असते व एक पाऊलही आपल्याला आपल्या मताप्रमाणें उचलता येत नाहीं.’

अजितची पाठ थोपटीत मीं त्याला म्हटलं, ‘ अजित, किती भाग्यवान् आहेस तूं आणि किती रेखीव आहेत आपल्या पार्टीचे आराखडे.’

'हो. जयंत, तें सागून टाकलं मी तुला आपल्या कार्याचं. आतां सांगणार आहे खाजगी. या कार्यक्रमाला नंदिनीला घेऊन आलो तो ह्या करतांच. ती सिनेमात गुगली असतां मी येथून पसार होणार आहें. कारण तसं उघडपणें तिच्यापासून जाताना तिच्या प्रश्नाना उत्तरे देता देतां मला पुरेवाट होईल. तूं तिला घरी पोहचेपर्यंत माझ्या कारस्थानाची काहीच दाद देऊं नकोस. रात्री मी सतीशकडे येईनच. पण तेथे कोणत्याहि नवोख्या कार्यकर्त्यांना आणूं नकोस. आपल्या पार्टीवर विश्वास ठेव आणि कार्य कर.'

चित्रपटाच्या मध्यांत आम्हा तिघाचे चेहरे एकमेकाना दिसूं लागले. अजित तर आता बेहद्द खूष दिसत होता. नंदिनी चित्रपटाची वाखाणणी करीत होती त्यावर अजित नि मी असंबद्ध उत्तरे देत होतों. तिच्या तें लक्षात आलं. 'तुम्ही चित्रपट पहात अहात की गप्पा मारीत अहात ! काय तरी बाई तुमची राजकीय मतं ? त्यापुढं तुम्हाला कला आणि सौंदर्य यांचं महत्त्व पटतच नाही.'

'नंदिनी न पटायला काय झालं ? राजकारण ही एक अशी वस्तू आहे की तिच्यात सर्व कार्यकारणाचं प्रतिबिंब दिसतं पंण तें ज्यानं आपला दृष्टिकोण नवीन बसविला असेल त्यालाच दिसूं शकेल.' अजित म्हणाला.

सरबताचा प्याला हवेंत फिरवत मी म्हणालो, 'जोपर्यंत चित्रपट करमणुकीचं साधन आहे, तोपर्यंत तर थिएटरना आपण विश्रांतिगृहच समजूं या.'

'हें काय तुमचं आपलं नवीनच निघतं काहीं तरी बाई.'

पण अजितनं नंदिनीला अगदी रोमान्सच्या कळसाला नेऊन पोंचविलं होतं. तिच्या केसावर त्यानं टीका केली. खादीच्या पातळात फक्त रंगाची पसंती दाखविली आणि ब्लाऊझच्या परदेशी कपड्याची जाणीव करून देऊन तिनं पेहेरलेल्या देशी नि परदेशी पोषाखाची सरभेसळ दाखवून दिली. येवढंच नव्हे तर स्वदेशात हा परदेश कशाला म्हणून विचारणा केली.

अजितची 'परदेश' ही कोटी ऐकून त्याची विनोदचतुरता लक्षांत आली. मध्यन्तरानन्तर दिवे विझले आणि अन्धार झाला तेव्हां माझ्या नयनाला अजितनं परदेश काबीज केल्याचं दृश्य दिसलं.

थोड्या वेळानन्तर अजित माझ्या शेजारीं आला आणि आपल्या सकस हातात माझा हात घेत म्हणाला, ' गुडबाय जयंत. '

मीं त्याचा हात हातात घेऊन त्याला बाजूच्या दरवाजापाशीं पोंचवीत म्हटलं, ' Comrade, wish you happy luck. '

आणि अशा रितीनं चित्रपटाच्या अन्धारात तो नंदिनीची नजर चुकवून निघून गेला !

रजतपटावर निशाणबाजीसारखी माझी नजर रोखली गेली. मन विचारात गढून गेलं. मला आठवण झाली. असाला संध्याकाळी बोलावलं होतं आणि दुपारी दिलीपला भेटायचा विचार केला होता आणि संध्याकाळ तर येथेच होऊन गेली होती.

' बघा ना विरहाचा कसा उच्चांक साधला आहे. ' नंदिनीनं माझ्या खांद्यावर हात ठेवीत म्हटलं. पण माझ्या चेहऱ्यावर तिची दृष्टि जाताच ती चपापली. ' अय्या ! म्हणजे अजित कुठं गेला ? '

' परतेल तो रात्री घरी. काय पाहिजे तुम्हाला ? ' मी थोडासा ओशाळल्यागत होऊनच म्हणालो. कारण अजितला पोचवून आल्यानन्तर मी चुकून त्याच्या खुर्चीवर जाऊन बसलों होतो.

नंदिनी पुन्हा चित्रपट बघण्यात रंगून गेली अन् मी आपल्या जागेवर सरकलो.

नंदिनीला घरी पोचविल्यानन्तर मी तिला अजितचा निरोप सागितला तेव्हां तिच्या चेहऱ्यावर हास्याची छटा चमकली आणि तिच्या त्या पाणिदार नयनांत जास्त पाणी साचल्याचा सुगावा मला लागला.

नंदिनीशीं लग्न लावण्याचा अजितन जेव्हा विचार कळविला होता तेव्हां सतीशनं उद्गारलेलीं वाक्यें मला आठवली. पण अजितनं ती वाक्यें किती खरी करून दाखविली. त्यानं समाजवादी साध्यासाठी नंदिनीचा गोड सहवास हेंच आपल्या जीवनाचं स्वारस्य असावं असं न समजतां त्यानं आपली कौटुंबिक जबाबदारी तोडून टाकली होती. शब्द आणि कृतीची जोड घालण्याकरितां, अन्धारांतून प्रकाशाची ज्योत तेवत ठेवण्यासाठीं तो निघून गेला होता.

दुसऱ्या दिवशीं मी ऑफीसमध्यें आलों. पुढच्या अंकाच्या कामाला

मला लागायचं होतं. जीवनकुमार बेपत्ता झाला होता. बेन उदास दिसत होती. सतीशनं, ' जीवनकुमारसुद्धा अजितप्रमाणं गुप्तपणें काम करण्यास गेला आहे. ' म्हणून सांगितलं तेव्हढंच मला माहीत होतं. बेनला त्याचा कांहींच पत्ता नव्हता. पण त्यानं सारं सामान बेनच्या घरीं आणून टाकलं होतं नि आपली खोली रिकामी करून ठेवली होती. संध्याकाळी तो बेनच्या घरीं असतांनाच एका मुलानं काहीसं पत्र त्याच्या हातात आणून दिलं. तें वाचून तो बराच गोंधळला अन् काहीशा गंभीरपणानंच तो बेनला, ' मी जरा बाहेर जाऊन येतों. ' असं सागून बाहेर पडला आणि तेव्हापासून तो जो गेला तो त्याचा अजून पत्ता नव्हता असं बेनकडून मला कळलं.

---

# १५

१९४० चा स्वातंत्र्यदिन नवीनच झोकात साजरा करण्यात आला होता. कॉंग्रेसमंत्रिमंडळं बाहेर पडलीं होती. तिनं आपल्या मागण्या स्पष्ट केल्या होत्या. मजूराच्या मागण्या तर त्याहीपेक्षा तडीस नेणे आवश्यक होतें. विद्यार्थ्यांनीहि या सर्व गोष्टीला पूरक असा उंच आवाज, केला होता.

स्वातंत्र्यदिनाच्या आदल्या रात्रीं संजीव मला भेटला होता. त्यानं नप्पू हॉलमध्यें सभा ठरविली होती आणि एका राष्ट्रीय, इंग्रजी भाषेंत लोकप्रिय असलेल्या दैनिकाच्या कॉंग्रेस गटातल्या संपादकाचं व्याख्यान ठरविलं होतं. स्वातंत्र्यदिनानिमित्त झाडून साऱ्या विद्या-मंदिराना कुलुपें लावण्याचा विद्यार्थ्यांचा पक्का विचार होता. सकाळी साऱ्या शाळातल्या सर्व मुलाची ते एक मिरवणूक काढणार होते. तिचं विसर्जन आणि भाषण नप्पू हॉल गार्डनमध्यें होणार होतं. हा त्या दिव-शीचा कार्यक्रम होता.

संजीव म्हणाला, ' हाटे, मिरवणुकीत फारच मजा येणार आहे उद्या. साधासुधा कार्यक्रम नाही उद्या. त्यात भलं मोठं आकर्षण ठेवलं आहे आम्ही. '

मी त्याच्याकडे पहात म्हटलं, ' अस्सं होय ? मग येईन की मी. '

अंहं ! नुसतं ' येईन ' नाहीं. तुम्हाला तिथं अध्यक्ष म्हणून यावं लागेल. कारण सर्व विद्यार्थ्यांची तशीच मागणी आहे.

× × ×

त्या गार्डनमध्ये लोकाची अथाग गर्दी जमली होती. टेबल आणि खुर्च्या एकीकडे बेवारशीपणे पडल्या होत्या. सारी गर्दी एक भलं मोठं वर्तुळ तयार करून उभी होती आणि मधल्या उघड्या वर्तुळात आगीचा प्रकाश चमकत होता. हा चमत्कार तरी कसला आहे तें पहावें म्हणून मी जवळ गेलों. मला वाट मिळाली अन् मी आत घुसलों. मला तेथें सर्व कार्यकर्त्यांचे चेहरेदिस ले.

एक काळा गाऊन पांघरलेला कार्डबोर्डाचा पुतळा काठीला बांध-लेला होता आणि तो काठीसह पुतळा असावरीनं आपल्या हातात धरला होता आणि जवळच जळणाऱ्या वर्तमानपत्राच्या ढिगाऱ्याच्या ज्वाला आग भडकवीत होत्या. संजीव माझ्या पुढें येऊन म्हणाला, 'ह्या पुत-ळ्याला आम्ही या चितेंत जिवंत जाळण्याचं ठरविलं आहे. आमच्या नावाची खोटी बदनामी करणाऱ्या नि राष्ट्रीय मनोवृत्तीला कलंक फासणाऱ्या वृत्तपत्राचा हा ढीग आहे. आणि राजकारणाला प्रतिगामी स्वरूप देणारा, हिंदुस्थानच्या पायातील बेड्याना घट्ट करणारा नि नकली लोकशाही दाखवून साम्राज्यशाही युद्धाच्या ज्वाला भडकविणारा हा चेंबर्लेनचा पुतळा आहे अन् या सतत पेटणाऱ्या वर्तमानपत्राच्या चितेंत हा चेंबर्लेन...'

तितक्यात मला मोटारचा हार्न ऐकू आला आणि त्यासरशी काही कार्यकर्त्यांनी तिकडे धूम ठोकली. संजीवहि लागलीच आपलं बोलणं टाकून तिकडे गेला. मी तिथेच मंत्रमुग्ध होऊन उभा राहिलो. पुढें काय होईल याची अंधूक जाणीव मला झाली होती. त्या चितेतून निघणाऱ्या ज्वालेनं असाचा आधीचाच ताबूस नि गौरवर्ण जास्तच खुलून दिसत होता.

तेथेच डेन आणि संजय हसत हसतच माझ्याकडे आलीं नि म्हणालीं, 'आज तुमचं व्याख्यान आहे म्हणे !'

मी त्या ज्वालाकडे नि पुतळ्याकडे बोट दाखवीत म्हटल, 'म्हणजे तुम्हाला नव्हता माहीत हा कार्यक्रम ?'

पण संजयला ते काही कळलं नाही अन् मी पुतळ्याकडे केलेलं बोट बघून तो म्हणाला, 'म्हणजे, आज मिस् असावरीचं व्याख्यान आहे की काय ?'

डेननें त्याला दोन तीन वाक्यात सारं समजावून सांगितलं आणि असावरीनंहि आपल्या हातातलं ओझं एका मुलाच्या हातात देऊन ती आमच्याकडे आली.

मी गालातल्यागालात हंसत विचारलं, 'ही कामगिरी नि ही कल्पना आहे तरी कुणाची ?'

आम्हा संपादकद्वयाचं हस्तान्दोलन झालं. ते जरा अभिनिवेशानंच माझ्याकडे पहात म्हणाले, 'ज्वालेच्या संपादकानं येथेहि ज्वाला निर्माण

केल्यान् तर ! ' आणि नंतर पाठीवर प्रेमानं हात थोपटून शालीनतेनं ते म्हणाले, ' पण जें काय केलं आहे नि घडत आहे तें वाईट आहे. स्वातंत्र्य-दिन हा काँग्रेसच्या तत्त्वानं साजरा करण्यात येत आहे अन् तुम्ही येथें चेंबर्लेनचा पुतळा जाळून लोकाच्या मनात हिंसात्मक वृत्तीच्या भावना चेतविण्याचा कार्यक्रम हाकीत अहा हे चागलं नाही. '

मी त्यांना म्हणालो, " हे जें काही ठरविलें गेलें आहे तें सारं तरुण विद्यार्थ्यांनी ठरविलं आहे. आमच्या पक्षचा नि कार्यकर्त्यांचा त्यात काहींहि संबंध नाही. तरुणाचं रक्त नेहमीच गरम असतं आणि काहीतरी अद्वितीय करण्याची त्याची धडाडी असते. पण तें जाऊं द्या. मला तर यात तुम्हाला वाटतं तसं काहीच वाटत नाही. मी आता थोडकाच तुमच्या आधी येऊन उभा आहें पण माझं मत विचाराल तर मी सागेन कीं ' हें जे सर्व होत आहे हे उत्तमच ! "

तो अहिंसावादी संपादक बिनसलाच या सर्व गोष्टीमुळें. त्याला ताळ-तंत्र राहिला नाहीं. त्यानं ' वंदेमातरम् ' गीत म्हणण्याच्या आधींच नि त्याहीपेक्षा माझ्या भाषणाच्या आधीच व्याख्यानाला सुरवात केली. त्यानं व्याख्यानात ताबडतोब लढा सुरू करण्याच्या गोष्टीऐवजी आजच्या स्वातंत्र्यादिनाच्या दिवशी घ्यावयाच्या शपथेंत शाततेच्या मार्गानं पूर्ण स्वातंत्र्य मिळविलें जाईल असं सागितलं.

भाषण संपविल्यानन्तर मला तो म्हणाला, ' माफ करा. तुमच्या कार्यक्रमात व्यत्यय येईल पण मला आतां गेलंच पाहिजे लवकर. ' असं म्हणून त्यानं माझ्याशीं हस्तान्दोलन केलं नि तो निघून गेला.

तो निघून गेला. पण तेथें जमलेली जनता अशातच झाली. त्याच्या समजुतीनं ते जें करीत होते ते रास्त होतें. मग असं असतांना त्या कॉंग्रेस-सेवकाना का नांवं ठेवावीत ? आणि ह्या तावा–तावानं त्यानी विशाब्दिक पुकार मारण्यास सुरवात केली.

शेवटी त्या चवताळलेल्या जनसमूहानं त्या चेंबर्लेनच्या पुतळ्याला चितेंत ठेवल्यानन्तरच सर्वत्र शातता पसरली.

एकीकडून सतीशनें अन् दुसरीकडून विभासनं माझ्या खांद्यावर हात ठेवीत म्हटलं, ' जयंत, काय आहे कीं नाही सुन्दर योजना ? अरे आमच्या

डोक्यांतून निघणाऱ्या युक्त्या म्हणजे पुढच्या क्रान्तीकरतां जय्यत असलेली शस्त्रेंच !'

मीं त्याच्याकडेच आळीपाळीनं पहात म्हटलं, 'म्हणजे त्यामागें तुम्ही होता तर !'

'हो. अगदीं वेळेवरच संजीवला तशी सूचना दिली होती. नाही तर गाजावाजा केला असता या गोष्टीचा जर कार्यक्रम न साधता तर.'

सतीशनं अध्यक्षस्थान स्वीकारलं. डेननं तो तिरंगी झेंडा आपल्या हातांत धरला. असानं आपल्या गोड आवाजात 'वंदेमातरम्' गीत म्हटलं. श्रोतृवृंद ह्या वेळीं अगदी शात होता. तिकडे ज्वालाहि राख बनल्या होत्या आणि अशा वातावरणात मी भाषणाला उभा राहिलों. डाव्या मनगटाभोंवतीं उजव्या हाताची बोटं फिरवीत मीं सुरवात केली.

"मित्रानो !

१९४० चा हा स्वातंत्र्यदिन नवीन घटना आणि नवीन संदेश देत आहे. आपण याचं थोडंसं नाटकहि येथे केलं आहे. युद्धाच्या भडकत्या ज्वालाहि पेट घेत आहेत. त्यांत दिखाऊ दानाची लोकशाही म्हणून टेंभा मिरवणारी राष्ट्रें उडी घेऊन ...आज आमचा मार्ग काट्याकुट्यांचा आहे पण त्याच्यापुढे आम्हाला एक नंदनवन दिसत आहे आणि तिकडेच आम्हाला कूच करायचं आहे. येवढंच नव्हे तर बरोबरीला आम्हाला साऱ्या साऱ्या जगातल्या गुलाम राष्ट्रांना घ्यावयाचं आहे. वर्गावर्गांतील लढा एवढा तीव्र होत आहे कीं हिंसा आणि प्रतिकार जगात एक उघड उघड वर्गयुद्ध पेटविल्याशिवाय राहणार नाहीं. आस्ट्रेलिअन सिव्हिल वॉर, फ्रान्समधील सार्वत्रिक संप, लंडनमधील दोन हजार कामगारांचा सार्वत्रिक संप, स्पेनमधील क्रान्तिकारी चळवळ, क्रान्तिकारक तत्त्वावर उभारलेली आक्सफर्डमधील विद्यार्थ्यांची प्रचण्ड मिरवणूक, बल्गेरियामधील समाजनाश, आणि हिंदुस्थानातील धरपकड नि फाशी हे सर्व वृत्तांत जेव्हा आपण वर्तमानपत्रांतून वाचतों त्या वेळेस अखिल

मानवता गुलामगिरीच्या साखळदंडातून सुटण्याकरितां चळवळ करीत नाही असं कोण म्हणेल ?

भयाण पार्श्वभूमीवर आपण आज स्वातंत्र्यदिन साजरा करीत आहोंत. आज तुम्हाला तुमचे दिसणारे पुढारी उद्या दिसणार नाहीत अन् उद्या ते दिसले नाहीत की तुम्ही हतबुद्ध होता कामा नये. पुढच्या लढ्यात आपलं केवळ आत्मदानच नव्हे तर बलिदान करण्याची तयारी ठेवा. शपथ घ्या अन् सांगा 'आम्ही सैनिक आहोत आणि पुढारी आहोत. राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी आमच्या शरीरातील रक्त.. ते वाहविण्याची आमची तयारी आहे.' इतका प्रबळ आत्मविश्वास आपल्या ठिकाणी बाणून घ्या आणि इतका आत्मविश्वास तुमच्या ठिकाणी आला की पुढच्या सोनेरी स्वातंत्र्याची आजच उगवलेली रम्य प्रभात...... "

× × ×

सकाळीं मला स्वातंत्र्याचा सोनेरी दिवस दिसत होता आणि त्याच आवेगानं मी असा बोलत होतो. कुणीकडून तरी धक्का बसावा आणि तो वेगप्रवाह नाहींसा झाल्यावर अंधार व्हावा–प्रकाशाची प्रतिक्रिया व्हावी, तसा प्रकार होता हा.

नप्पू हॉलमध्यें माझं भाषण चालू असतानाच एका मुलानं मला पाकीट आणून दिलं. भाषण करता करता तेथेच उलगडून पहाण्याच्या किंमतीचं होतं ते. त्यात होतंः—

" भाई जयंत,

आज सकाळी बऱ्याचशा कॉम्रेड्सच्या घराच्या झडत्या झाल्या आहेत आणि उद्या ऑफिसवर रेड येण्याचा सुगावा आहे तर आता निमिषाचाहि वेळ खर्च करूं नकोस. तातडीनं पुढचा मार्ग शोध."

तुझाच,

**सतीश.**

मीं वाचून बाजूला बघितलं. सतीश माझ्या भाषणाच्या मध्यांतूनच निघून गेल्याचं मला कळलं. एखाद्या तार विणणारानं अर्ध विणणं सोडून चालतं व्हावं आणि मग ती अर्धी विणलेली वस्तु कुचकामी ठरावी तसंच काहीसं माझ्या भाषणाचं झालं. पण मी संजीवला बोलावून माझ्या जाण्याचं काहीहि कारण न सांगता पुढचा कार्यक्रम विद्यार्थी-कार्यकर्त्यांकडून चालू ठेवायची सूचना देऊन तेथून निघालों. असा नि डेन माझ्याकडे साऱ्या श्रोतृवृन्दापेक्षाही चमत्कारिक नजरेनं बघूं लागल्या.

मी तडक 'ज्वाला' ऑफीसमध्ये आलो. परवा निघणाऱ्या अंकाचीं प्रुफं माझ्या टेबलावर पडली होती. पोऱ्या टेलिफोनचा डायल उगिचच फिरवत होता. माझ्या बसायच्या खुर्चीवरील भिंतीवर असलेलं नेहरूंचं कॅलेंडर वाऱ्यानं वरवर उडत होतं. पोऱ्याला बाहेर बसण्याचा हुकूम दिला. मी दार लावून घेतली आणि सिगारेट न शिलगावता शांत चित्तानं साऱ्या मुख्य कागदाचा एक ढीग तयार करूं लागलो.

ढीग तयार होतो न होतो तोंच दारावर जोराची थाप मला ऐकूं आली. माझ्या छातींत धडकी भरली. अजून तो गठ्ठा मला एकीकडे नेऊन ठेवायचा होता अन् आता......पुढच्या दारावरची थाप ऐकूनच मी गठ्ठा नीट बांधला. दारावरील आवाज चालूच होता. मी तो गठ्ठा घेतला आणि खोलीच्या मागच्या बाजूनं त्यासह बाथरूमकडे धूम ठोकली. गठ्ठा सुरक्षित-पणें ठेवण्याची सोय झाल्यानन्तर मला बरंच हायसं वाटलं. आता मी आत आलों. टेबलावरील लेखनसाहित्य सारं नीट लावलं. बाजूला अस्ताव्यस्त पडलेली कागदे नीट ठेवली आणि हें सर्व तीन मिनिटात आटोपून मी दार उघडलं.

पण माझी अपेक्षा फोल ठरली. तो दिलीप होता! त्यानं मला पाह-तांच विचारलं, 'अरे करीत होतास काय आत इतक्या वेळेपासून.' अन् आत येत मिस्किलपणानं म्हणाला, 'प्रतिभेला असं कोंडून ठेवणं बरं नाहीं हं जयंत!'

'विरोधी शक्तीकडून प्रतिभेच्या उत्पादनावर नियंत्रण पडूं लागलं तर तिला असंच कोंडून ठेवावं लागतं कुठे तरी बरं का दिलीप.'

दिलीपच्या हातांत सिगारेट देत मीं म्हटलं, 'दिलीप, तूं इकडे

वाकडी वाट कशी वळवलीस ?'

'अंहं ! तसं काहीं नाहीं. पण मी दोन तीन दिवस झाले मुंबईत आलों. इकडच्या बाजूस सहज काहीं कामाकरता आलो होतों तर म्हटलं घ्यावी भेट तुझीहि.'

'तेही ठीक आहे. पण तुम्ही डायरेक्टर लोक भेटी काही फुकट घेत नसता. डॉक्टरच्या व्हिझीट-फी पेक्षाहि जबर किमत असते तुमच्या भेटीना.'

दिलीप आपल्या पडलेल्या लाबट चेहऱ्यावरून हात फिरवीत म्हणाला, 'काहीं म्हण बुवा तूं, पण जर तू इतकी जबर किमत द्यायला तयार असशील तर मी सागतो सर्व तुला !'

मी प्रश्नाकित चेहरा करून नि पुढची प्रुफं तपासीत म्हटल, 'म्हणणं तरी काय आहे दिलीप तुझं ?'

'जयंत, असावरी धनंजय तर तुझ्या चागली ओळखीची आहे ना ? मग तूं जर तिला सागितलंस नि तसं तिचं मन वळविलंस तर मला तिची सिनेमा-संसारात बरीच मदत होईल.'

मी खुर्चीवरून जरा पुढे होत म्हणालो, 'दिलीप, तुझी वागणूक फारच वाईट होत चालली आहे. युरोपचा प्रवास करून आलं म्हणजे मनहि भ्रष्ट होत असतं की काय ? त्या रात्री धनंजयच्या घरी तूं माझ्याशी मनमोकळेपणानं बोललास पण त्यातच तूं गैरसमजाचे जंतू बाळगून ठेवलेस आणि तिकडे जाऊन पेरीनला सागून देखील टाकलेंस तसें ! स्त्रीपुरुषाना एकत्र बघण्यात तुझी इतकी गचाळ मतं असतील अशी मला कल्पना नव्हती.'

'हो. मीं गप्पांच्या भरात सागून टाकलं पेरीनला तसं अन् तुम्हा दोघाचा इतका जिव्हाळा दिसला मला की कदाचित्...' तो गागरला नि पुनः माझ्यावर दृष्टि रोखीत म्हणाला, 'जयंत बॅ. धनंजयचं फारच चागलं मत आहे तुझ्याबद्दल आणि माझी त्या संबंधाबद्दलची तीच कल्पना फारच दृढ झाली.'

'बरं जाऊं दे त्या गोष्टी दिलीप. हं तुझं सिनेमाचं कसें काय चाललं आहे अन् आता काश्मीरची सफर मारून काय करणार आहेस तिथं ?'

'तें मी तुला सर्व काही सागेन. पण माझ्या प्रश्नाचं उत्तर काय ?

मी काश्मीरला जाऊन 'कुणाचं जग ?' या चित्रपटाचं शुटींग हातांत घेणार आहें. ही चित्रपटकथा संजयनें लिहून दिली आहे हें तुला माहीतच आहे. किती सुंदर लिहिली आहे त्यानं ती ! मला वाटतं तूं वाचली असशील ती.'

मी त्याला मध्येंच थाबवीत म्हटलं, 'हं दिलीप अस्सं तर एकंदरीत.'

'अरे हो ! जयंत, मी कलकत्त्याला शिरीनला भेटलो होतों. आतां फारच सुंदर दिसत आहे ती. तिनं आपल्या तरुण बंगाली शिक्षकाशीं लग्न लावून टाकलं आहे अन् फार फार आनंदात आहे. साऱ्या बंगालमध्यें त्या दोघाचे विवाह-फोटो वर्तमानपत्रात मिरवत आहेत.'

मीं चहाचा घोट घेत म्हटलं, 'ते सर्व मला कळलं आहे.'

'बरं मग, जयंत, आतां सांगूं तरी काय तुला ? ज्या ज्या गोष्टी मी तुला सागतों त्या त्या तूं साऱ्या कळल्या आहेत म्हणून म्हणतोस अन् मी नवीन प्रश्न पुढे ठेवतो तर त्याकडे डोळेझाक करतोस याला काय म्हणावं ? मी चित्रपट काढून क्रान्तीचा प्रचारच करणार आहें ना ! जयंत, लक्षांत घे. तुम्हा क्रान्तिकारक बुद्धिजीवी लोकाकडूनच मला तसल्या प्रकारच्या मदतीची अपेक्षा आहे. या वेळेस अजित जर असता तर त्यानं हरतऱ्हेनें मला मदत केली असती.'

मी रागानं त्याच्यावर डोळे खोवीत म्हणालों, 'म्हणजे त्यानं कांहीं नंदिनीला सिनेमात काम कर म्हणून सागितलं नसतं.'

'म्हणजे तूं म्हणतोस तरी काय जयंत ?' दिलीप हंसत माझ्याकडे पहात म्हणाला, 'अजित, नंदिनी नि जयंत......असा......'

त्याच्या या वाक्यावर घाव घालीत मी म्हटलं, 'असं मी सागत नाहीं. पण तूं भलत्याच कामात मध्यस्थी करूं नकोस. हा ज्याचा त्याचा वैयक्तिक प्रश्न आहे.'

दिलीप आता चूप झाला होता. मीं माझ्या एका लेखाचीं प्रुफें तपासल्यानंतर त्याच्याकडे बघितलं. तो एक सिनेमाचं मासिक चाळीत होता.

माझ्या मनांतहि या वेळीं गडबड माजली होती. दिलीपनं माझ्या-बद्दल गैरसमज करून घेतला होता. तो काश्मीरला जाणार होता अन् तिथं

गेल्यावर तो बयराम पपाना भेटणार अन् त्याचा गैरसमज असाच राहिला तर......?

'दिलीप!' पण मी त्याला हाक मारूनच स्वस्थ राहिलो. ती गोष्ट त्याला सांगावीशी वाटेना मला. असाच्या आणि माझ्या संबंधाचं मी या वेळात आत्मनिरीक्षण करूं लागलो. तसतसं त्याला निराळ पटवून देणं म्हणजे चोपड्या जागेवर पाणी टाकण्यासारखं मला वाटलं.

पण दिलीपला मी हाक मारली होती. तो आपल्या फुगीर लाबट गालावरून हात फिरवीत म्हणाला, 'हं काय म्हणतोस जयंत?'

'अंहं! काही नाही रे. पण तूं काश्मीरला जाणार आहेस ना तर बयरामजीना भेट आणि मी नि डेन अगदी आनन्दात आहोत असं अवश्य सांग.'

'हो. डेनला मी भेटेनच. तिला काही निरोप सांगायचा असला तर! ती म्हणत होती मला एकदा पपाना भेटायचं आहे जाऊन.'

'जाऊन भेट म्हणावं. पण ती इतक्यातच तर तिकडे काही येऊं शकणार नाही. कारण इथं किती तरी कामं आहेत अन् त्यात पुन्हा तिचं मेडिकलचं शेवटचं वर्ष.'

'बरं तर जयंत जातो मी आता. मी तुला भेटत जाईन असंच मधून मधून. तूं निदान तशी मला मदत केली नाहीस आम्हाला तरी पण तुझी कृपा असली तरी पुष्कळ.'

'हो दिलीप. ते सर्व खरं आहे. क्रान्तिकार्यांचा मक्ता काही एकट्या-नंच घेतला नाही. त्याला साऱ्या धंदेवाईक लोकांचीहि आवश्यकता असते. पण मला तो मार्ग सोईस्कर वाटत नाही. नाच, गाणं, तमाशा, नाटकें आणि सिनेमा यात संगीताचं नि नाचण्याचं स्तोम फार. किती केलं तरी तें एक मनरंजन करण्याचं स्थान. मनरंजनातून प्रचार तेव्हाच होईल कीं जेव्हा शिस्तीनं नि पद्धतशीर मार्गानं आपल्या मायभूमीवर होमकुंड माजून स्वातंत्र्य मिळेल! तोंपर्यंत तर आम्हाला बुद्धिवादी संघर्ष आणि आगेकूच करणारी प्रेरणा पाहिजे आहे.'

दिलीपला ते कळलं की न कळतांच तो, लिफटच्या दारांत मी त्याला पोचवायला जाता जाता माझ्या खांद्यावर हात टाकीत

म्हणाला, ' Dear Comrade I pity you. '

दिलीप परतला. धाग्याची गुन्तागुन्त व्हावी तशी माझ्या मनाची स्थिति झाली. या राजकीय चळवळीपासून संजय नि डेनची दृढ होत चाललेली मैत्री, त्यानं लिहिलेली जीवनपटकथा, असाची वारंवार माझ्याकडे ओढ, दिलीपचा डेनशी संबंध आणि त्याचा शेवट आणि संजयच्या चित्रपटकथेला पाहिजे असलेली नायिका, बयरामजीला मी दिलेलं वचन, असाची राजकीय आन्दोलनात काम करण्याची दक्षता आणि तिच्या या कार्यप्रवणतेला सिनेमा धन्द्यात उतरविण्याची तिच्या पालकाची नि मित्राची शिकस्त......

माझ्या मनात हा सारा हलकल्लोळ माजला होता. मी लेखणी हातात घेतली. घड्याळात पाचाचे खणखण ठोके वाजले.

अन् त्याचसरशी अजय घाबऱ्या घाबऱ्या माझ्याकडे येत म्हणाला, ' जयंत, आताच्या आता तुम्ही येथून जा. सी. आय. डी. पोलिसाची आणि इन्स्पेक्टराची मोटार या रस्त्यावरून येऊ लागली आहे. '

आणि मी लेखणी कागदावर ठेवीत म्हणालों, ' मग इथं राहणार काण ? '

' डेन आणि संजय इथं येत आहेत आणि विनय नि संजीवलाहि कॉंग्रेस कमिटीनं इथ निघून येण्याबद्दल फोन केला आहे. '

मी कोट चढविला. केस कपाळावर चढविले अन् अजयला गुडबाय करीत लिफ्टची वाट न बघताच जिना उतरूं लागलो.

पण मोटारचा हार्न वाजला.

मी धिटाईनं एक एक पायरी उतरत होतों तितक्यात खाडखाड करीत पाढऱ्या पोषाखातला नि पिवळ्या हॅटमधला सार्जन्ट माझ्या पुढ्यात उभा रहात म्हणाला, ' जयंत हाटे आहेत का वर ? '

मी मिश्किलपणानं त्याच्याकडे हंसत म्हणालों, ' कां? हो आहेत. वर लिहीत बसले आहेत. हा मी तेथूनच येत आहें. '

' हें बघा त्याच्यावर पकड वॉरन्ट आहे. '

मी कपाळावरचा घाम पुशीत म्हणालों, ' पकड वॉरन्ट ? अं...अं... ते आहेत वर. '

तो खाडखाड बूट वाजवीत वर गेला अन् मी पुढच्या पायरीचा आधार न घेतांच खालीं उतरलों.

आणि पुन्हा खाली येताच त्याच वेषाच्या पण निराळी हॅट असलेल्या पोलिस अधिकाऱ्यानं मला विचारलं, 'जयंत हाटे...'

त्याचं पुढचं वाक्य बन्द करीत मी म्हणालों, 'हो वर.'

आता मी गर्दीत मिसळलों. ट्रॅमगाड्या चालल्या होत्या. बसेस जात होत्या. अगदीं रीघ न लागणाऱ्या त्या गर्दीतून मॅजेस्टिक सिनेमासमोर मी येऊन उभा राहिलों. आता पुढे काय? पण मी विसरलों तरी कसा? अजयन माझ्या हातात चिठ्ठी दिली होती.

'Wait at Mr. Purushottamdas Shroff's Bungalow.'

मला आता श्रॉफजीकडे जाणं भागच होतं. मी बस गाठण्याकरिता जरा पुढे सरकलो. तोच त्या बाजूनें गिरगाव रोडवरून विद्यार्थ्यांची प्रचंड रीघ आणि स्वातंत्र्यदिनानिमित्त ते चौपाटीवर नेणार असलेलं डेमॉन्स्ट्रेशन मला दिसलं. माझ्या मनात उत्साह सळसळूं लागला आणि छातीत धडधड होऊं लागले. एकीकडे विद्यार्थ्यांच्या मिरवणुकीत आत्मसमर्पण करण्याची इच्छा तर दुसरीकडे आताच निघालेलं पकडवॉरन्ट या दुहेरी घालमेलींत मी एका गल्लीत सटकलो.

गल्लीत गारुड्याचा खेळ चालला होता. तो पेटाऱ्यात झांकून ठेवलेल्या सापाला बाहेर काढून नाचवीत होता. मला वाटलं, कॉंग्रेसच्या पेटाऱ्यात स्वातंत्र्याचा नाग गांधीजींच्या अहिंसेच्या पुंगीनं असाच खेळला जात आहे. या दिखाऊ भंपकशाहीचा आम्हाला तिटकारा आला आहे. स्वातंत्र्याच्या वेळा जवळ येत असूनहि स्वातंत्र्य आम्हाला दूर आहे.

विद्यार्थ्यांच्या हाका लांबलांब जाऊं लागल्या. मी हळुहळू पावलं टाकून रस्ता जवळचा करूं लागलों. तसं पाहिलं तर मी स्वातंत्र्याला असा कितीसा हातभार लावला होता? माझ्या कामगिरीचा आढावा मला अगदींच कमी भासला. लोकांच्या प्रचंड समूहाला चेतना देण्याची नि त्यांना स्वातंत्र्याच्या मार्गावर आणण्याची जाणीव मला तीव्र होऊं लागली. पण......

पण दोन पोलिस मला धक्का देऊन गेले होते. मी विचारतंद्रींतून जागा झालों. श्रॉफजींचं घर गाठणंच आता सोयिस्कर. कारण एव्हांना गिरगाव भागात माझ्या फरारीचा गाजावाजा झाला असेल आणि असं झालं नि मी मध्येंच धरला गेलों तर माझ्याकडून केव्हढा शिस्तभंगाचा अन्याय घडेल !

मीं बस् पकडली अन् श्रॉफजीकडे जाण्याकरिता तीत अधीर मनानं जागा घेतली.

---

# १६

बऱ्याच अंतरावर बस् सोडून मी पायींच वरळी–चौपाटीवर श्रॉफ-जींच्या बंगल्यापाशी येऊन ठेपलों. आवारात गेलों. पण आवारात श्रॉफ-जींची मोटार दिसली नाहीं. मी घाबरत घाबरतच ब्लाकच्या दारावरील हाकघंटी वाजविली. दार उघडताच मला एका पोक्तशा बाईनं दर्शन दिलं. प्रथमक्षणींच मला तिच्याबद्दल आदर वाटू लागला. माझ्यावर समाधानाचा दृष्टिक्षेप टाकीत ती म्हणाली, 'तुमचंच का नाव जयंत हाटे? मग...मग या तर आत. आताच श्रॉफजींचा फोन आला होता की, या नावाचे गृहस्थ आल्यास त्याना माझ्या खाजगी खोलीत बसवून ठेव. कॉंग्रेस हाऊसमधली कामं आटोपून हा येतोच मी तिकडे.'

मी त्यानी बोट दाखविलेल्या खोलीत शिरलों. खोलीची सबध दारं स्प्रिंगची होती. अन् मी आत दाखल होताच ती आपोआप मिटलीं गेली.

आता मी खोलीत एकटा होतो. बाहेरल्या साऱ्या जगाची नि माझी ताटातूट झालेली होती. सबंध दिवसातली एक एक घटना माझ्या डोळ्या-समोर येत होती. मला माझ्या आयुष्याचं कार्य काय हेच कळेना. जीवन अन् अजितसारखी माझी स्थिति होते की काय याची मला अंधुक शंका येऊं लागली होती पण श्रॉफजी घरी येईपर्यंत मला माझ्या निकालाची वाट पहावी लागणार होती.

संध्याकाळ झाली होती. खोलींत अंधार पडला होता. खिडकींतून दूर बाहेर काळाकभिन्न सागर खोल खोल हालचाल करीत असलेला दिसत होता. तिकडून येणारी लहानशी वाऱ्याची झुळूक मनाला आशावादी बनवीत होती. श्रॉफजीच्या खाजगी खोलीची मांडणी तरी पहावी असा विचार करून मी भिती चाचपून विजेचं बटन दाबलं. प्रकाश पडला. खोलीची रचना पाहून मला आनन्द तर झालाच पण श्रॉफजींच्या बाबतीं-तली उत्सुकताहि जास्त वाढली. दारासमोरील आतील खिडकीवर महात्माजींचा एक सुंदर पोर्टरेट फोटो टांगला होता. डावीकडच्या बाजूला लिहिण्याचा टेबल अन् तिथं खूप अस्ताव्यस्त पडलेली कागदपत्रे होती. उजव्या बाजूला एक पुस्तकाची भली मोठी अलमारी दोन्ही पट दूर करून

माझ्यासारख्या वाचनेच्छु माणसाला उपभोग देण्याकरता उदार मनानं उभी होती. मी श्रॉफजींच्या खोलीत गेल्याबरोबर कशावर जर हक्क गाजविला असेल तर तो अलमारीतल्या पुस्तकावर.

पुस्तके चाळण्यात माझी पंधरा एक मिनिटें गेली असावीत पण माझ्याकडल्या बाजूला कोणीच फिरकलं नव्हतं. श्रॉफजींच्या साऱ्या बंगलीत अगदी पूर्ण शातता वास करीत होती. नोकराची वर्दळ नव्हती किंवा घरातल्या माणसाचे संवादहि ऐकू येत नव्हते. सगळीकडे शात. मला त्या तसल्या स्थितीत काय करावं हेच सुचेना. एका क्षणात मला वाटे आता कदाचित् बाहेरच्या जगाशी आपली ताटातूट होणार आहे तर याच रात्री जाव असाकडे नि डेनकडे अन् यावी शेवटची भेट घेऊन तर दुसऱ्या क्षणी वाटे छे! त्याच्याकडे अशा निकडीच्या वेळेस जाणं म्हणजे लपण्डाव करण्यासारखं आहे. माझ्यापुढे तर निराळाच कार्यक्रम आखला जाणार आहे अन् त्या कार्यक्रमात साऱ्या प्रिय वस्तूचा त्याग हाच महान् ध्येयपूर्तीचा मार्ग बनणार आहे.

खूब मनसोक्त थंड वारं अंगाला झोंबावं म्हणून मी पडदे सारलेल्या खिडकीच्या अगदी समोर उभा राहिलो. पण आवारात मोटार आल्याचा मला आवाज आला आणि मागे वळून पहातो की नाही तोच 'बहेन आले आहेत ना हाटे' असा आवाज अन् त्याच सरशी श्रॉफजींची मूर्ति स्प्रिंगचीं दारं धाडकन् उघडून आत आली अन् त्यामागून सतीशही आत आला. श्रॉफजी धान्दलीत होते. त्याचं गुजराथीवजा नेसलेल धोतर, पर्शियन कोट, वर खादीची टोपी—ते स्थूल असूनही हा सर्व सरंजाम बघून ते धान्दरट आणि गडबडे असावेत असा त्याजबद्दलचा पहाणाराचा ग्रह होत होता.

मला बघताच माझ्यावर बेहद्द खूष होऊन ते म्हणाले, 'काय हाटे, आज स्वातंत्र्यदिनाच्या मुहूर्तावर तुम्ही आपलं राजकारण लढवायला सुरवात केलीत तर!'

'वा:! श्रॉफजी! राजकारण आता सतीशच्या मदतीनं लढलं जाणार, माझी लेखणी बोथट बनली. तिच्यावर निर्बंध पडले ना.'

सतीश खुर्चीवर बसत म्हणाला, 'श्रॉफजी, काहींही म्हणा पण आम्हाला कबूल करावं लागेल कीं ज्या लेखणीची बहादुरी आम्ही मारली

ती फक्त तुमच्यासारख्या लोकांच्या आधारावर.'

श्रॉफजी अंगावरील कपडे काढीत नि एका हातात चष्मा घेऊन त्याची काच पुसत म्हणाले, 'बहेन चल वाढ बुवा. तीन ताटं हं. लौकर. भूक लागली आहे फार' आणि आमच्याकडे वळून म्हणाले, 'तुम्हालाहि भूक लागली असेल नाही?'

सतीश काकुळतीनं म्हणाला, 'खरंच भुकेपेक्षा झोपेची मात्र फार गरज आहे. सकाळच्या त्या नप्पूहाल प्रकरणापासून जी माझी धावाधाव चालली आहे ती विचारू नकोस. अजून किती भटकावं लागेल हेच मला कळत नाही.'

'श्रॉफजी, अन् मला तर खूप जेवल्यासारखं वाटत आहे. आज मीं कशा सरकारच्या हातावर तुरी दिल्या आहेत! नुसत्या त्या घटनेमुळंच मला भूक लागल्याची जाणीव लोपून गेली आहे.'

श्रॉफजी आम्हाला उठवीत म्हणाले, 'चला, चला. तुम्ही कम्युनिस्ट लोक साऱ्याच कामांत आघाडी मारता आणि आलेल्या प्रसंगाला बेडरपणें तोंड द्यायच्या तुम्हाला युक्त्या तरी कशा सापडतात बुवा! मी जर संपादक असतो तर मुकाट्यानं त्यांच्या हवालीच झालों असतों.'

सतीश त्याना थांबवीत म्हणाला, 'हो श्रॉफजी, तुमचं तसं म्हणणं मीहि कबूल करतों पण आमच्याजवळचीं सर्व चांगलीं चांगलीं माणसं अशीं आपखुशीनं त्यांच्या स्वाधीन होऊं लागलीं तर आमच्या कामगारांची चळवळ चालवायला त्यांच्यात गांधी कुठं आहेत?'

गांधीचं नाव घेताच श्रॉफजी जास्त खुषींत आले नि म्हणाले, 'तुम्हा लोकांचा गांधीवर एवढा कटाक्ष कां? कामगारांच्या चळवळींत नि कॉंग्रेसच्या चळवळीत आतां फरक रहाणार आहे कुठं? 'आता पुढें कॉंग्रेसच्या आन्दोलनात कामगाराना नि विद्यार्थ्यांना वेगळं रहातां येणार नाहीं' असं एका मुलाखतीत गांधी म्हणाले होते.'

"नाही–तसं होणं शक्य नाहीं श्रॉफजी. कामगारांची चळवळ चालवूं शकायला गांधीगट एवढा प्रबळ नाहीं. पुढील समाजवादी ध्येयाचीं स्वप्नें रंगवून अन् उंच उंच बंगल्यांत राहून समाजवाद अस्तित्वांत ठेवून मजुरांवर पुढारकी गाजविणं अशक्य गोष्ट आहे."

'भय्या, अरे तूंही नीट जेवत नाहींस अन् तुझ्या आलेल्या मित्रा-कडेहि लक्ष देत नाहीस. नेहमीच तुझा धादरा स्वभाव.' बहेनच्या बोलण्यानं आम्ही थाबलों, आमचा संवाद थाबला. थोडंसं मध्ये बोलून सतीश आपल्या नेहरू शर्टच्या अस्तन्या वर सारून जेवणावर ऐसपैस ताव मारूं लागला.

जेवण झाल्यानंतर आम्ही श्रॉफजींच्या दिवाणखान्यात येऊन बसलों होतो. घडामोडीवर काहीतरी बोलण्यापेक्षा माझ्या आजच्या तातडीनं घडलेल्या घटनेवर बोलण्यात त्याना आनंद होत होता.

सतीश म्हणत होता, 'जयंत मला आधीच माहीत झालं होतं कीं तुझं साप्ताहिक बंद पडणार. जीवनकुमारला धरलं त्याच वेळेस मी तुला फोननं तसं कळवलं होते आणि बर झालं, आज दुपारी पोलीस-इन्स्पे-क्टरच्या ऑफीसमधून × × × नावाच्या आपल्या एका पार्टीमेम्बराचा फोन आला म्हणून ताबडतोब तुझ्याकडे जासूद पाठवून तुला वाचवूं शकलों.'

श्रॉफजी आपला रात्रीचा पोषाक करीत म्हणाले, 'तरींच. पण सतीश सगळीकडेच असे जासूद ठेवले तर...तर कार्यांत गोधळ उत्पन्न होणार नाहीं काय?'

'त्याबद्दल बेफिकीर रहा श्रॉफजी. काहीना आम्ही जवळ करूनहि लांबचे समजतो अन् काहींना आम्ही लाबचे असूनहि जवळचे समजतों अन् महत्तम कार्याच्या निकडीकरता जवळ ओढतो.'

'पण' सतीश बोलूं लागला कीं वहात जात असे त्याला थाम्बवीत मी म्हणालों, "सतीश, पण माझी अवस्था काय आणि मी आता कार्य तरी करणार कसं?"

श्रॉफजी आराम-खुर्चीशीं पुढें येत म्हणाले, 'कॉमरेड्स झोपा आतां. उद्यां उठून विचार करूं. माझ्या इथं सुरक्षित अहांत तुम्ही. काहीं काळजी करूं नका अगदीं.'

सतीश स्वतः उठत नि मला उठवीत म्हणाला,

'माफ करा श्रॉफजी. तुमचं आणि आम्हा कम्युनिस्टाचं बरंच सख्य आहे असा गांवात गवगवा आहे. आणि जयंत पोलीसाना दिसेनासा झाल्यापासून ते त्याच्या काहीं मित्रांकडे नि संबंधांतल्या लोकाकडे विचारणा

केल्याशिवाय रहाणार नाहीत.'

'मग तुम्ही आता ठरवणार काय अन् करणार कसं ?'

सतीश श्रॉफजीच्या कानात कांही तरी सागून पुढे निघाला अन् मीं 'बरं तर श्रॉफजी' असं म्हणून नमस्कार करून बाहेर पाय काढला.

× × ×

आम्ही रस्त्यावर आलों. अगदी निबिड काळोख पसरला होता. थंड गार वारा अंगाला झोंबत होता. प्रकाशाची प्रतिक्रिया चालू होती. स्वातंत्र्याच्या प्रकाशावर साम्राज्यशाहीने आपल्या सुलतानी कायद्याचे नवीन नवीन काळेकुट्ट पडदे पाडायला सुरवात केली होती. पण आशा-वाद हा अमर आहे. निसर्गाच्या या काळोखी वातावरणात सुद्धा वर आकाशातल्या तारका स्वैरवृत्तीनं अंधःकाराचा प्रतिकार करीत होत्याच कीं नाही ? आणि त्याचप्रमाणे आमच्या महान् कार्यक्रमानं या साम्राज्य-शाहीच्या अंधाऱ्या राजवटीत त्या तारकासारखं अंधारातच उंच ठिकाणी राहून मानवतेत खूप खूप खळबळ माजविण्याची आमची दाडगी मनीषा होती. मला लिओनार्डो व्हिन्साचं ध्येयवाक्य आठवलं "Merge thyself with the forces of nature Transform thy spirit.' राजकारणात पडलेल्या लोकाना या कलावंताची ध्येयवाक्ये स्वप्नाप्रमाणें वाटतात पण त्यात केव्हढा अर्थ होता ! तो निसर्गाशी जितका तन्मय झाला होता तितक्याच कार्यप्रवृत्तीचे धडे देणारा लेनिन पूर्वापार चाल-लेल्या रूढी, सामाजिक बंधनें आणि नियम याना झुगारून आयुष्याची नवीन सुधारणा आणि दास्यविमोचन करण्यास श्रेष्ठ ठरला.

वरळीहिलच्या पायथ्याशी आम्ही आलों. सतीश एकसारखं बोलत होता, सूचना देत होता अन् मी ते सारखं ऐकत होतों. 'बरंचसं तुझ्याशी बोलायचं आहे. नाही तर मग तुझ्याशीं तितकं मोकळेपणी बोलतां येणार नाहीं.'

थंड गार वारा झोंबत असताना अन् अंधार भोवताली पडला अस-ताना साधारण अकरा साडेअकराच्या सुमारास सतीशच्या हातात हात घालीत आम्ही वर जाऊन बसलों. सतीश आता आनंदात होता. त्याचा तो काळजी नि चिंतेचा भाव दाखविणारा चेहरा आता मधुर नि मोहक

हास्यानं माखलेला दिसत होता आणि त्याचे ते लाल ओठ सिगारेट न ओढताही सिगारेट पेटविल्यागत दिसत होते. आणि तसं पाहिलं तर सतीशला सिगारेट पिण्याची गरजच कुठे होती ? त्याच्या बाजूला पेटलेलें दारिद्र्य अन् अन्याय याच्या ज्वालेंत तो आपलं समाजवादी बुद्धीचं शरीर झिजवून नि फुंकून अज्ञानाचा धूर दूर सारीत होता.

वर जाऊन बसताच मला सिगारेटची आठवण झाली. मी खिशातून पाकीट काढून सिगारेट पेटविली आणि पाकीट त्याच्या पुढ्यात सारलें. तो त्याचा अव्हेर करीत म्हणाला, 'जयंत, आता या घडीला तूं सिगारेट पेटवीत आहेस पण जिथं तूं जाणार आहेस तिथं तुला विडीहि मिळणार नाही कदाचित्. आता तुझं बाहेरचं आयुष्य संपलं. तुझी प्रिय माणसं तुला भेटणार नाहीत, सूर्य तुला दिसणार नाही, अशाच एका शहराच्या निर्मनुष्य ठिकाणी तुझ्याशी संबंध ठेवणाऱ्या कार्याच्या व्याधि वाढतील, अशा व्यक्तीशी भेटीगाठी होत जातील. त्याचप्रमाणे सूचना देणारे आणि अशा भेटी घडवून आणणारे आपले बातमीदार भेटत जातील पण या सर्वांशी तूं काही संबध ठेऊ शकणार नाहीस. तर तुझ्या विश्वासाच्या माणसांपैकी कुणाचंही नाव सांग म्हणजे तोच फक्त तुला भेटूं शकेल असं करता येईल.'

सतीशच्या प्रश्नावर माझें मन अंतर्मुख बनलं. मला माझ्या सहकाऱ्याची आठवण होऊं लागली. संजीव, संजय, विनय, बेन, डेन नि असावरी एक एक करून सारी माझे डोळ्यापुढे येऊन गेली. संजीव नि बेन फार बोलके असल्यामुळं त्यांच्याशी तसा संबंध ठेवण्याचं मला टाळावं लागले. डेन नि असावरीच्या बाबतीत मला वाटणारं निरनिराळं आकर्षण नि त्यापासून माझ्या नवीन ध्येयात्मक मार्गात व्यत्यय येईल या विचारानं मी ते टाळलं. संजयचंच नाव सुचवावंसं वाटलं. ते सुचविण्यात माझा एक अंतर्गत डाव होता. एक तर माझं साधारण खाजगी आयुष्य त्याच्या पूर्ण परिचयाचं होतं अन् दुसरं असं की डेन नि असा व माझ्यामध्यें तो बातमीदाराचं काम करण्यास लायक होता. मी जळती सिगारेट दूर भिरकावीत अन् अंधाऱ्या रात्रींत अंधाराला कापीत चाललेल्या त्या ठिणगीकडे बघत सतीशला म्हटलं, 'कॉमरेड संजयचं नाव सुचवलं तर चालेल ?

सतीश त्या खाली पडलेल्या जळत्या सिगारेटच्या जागेकडे बघत म्हणाला, ' तुला तो सर्व दृष्टीनं पसंत असल्यास माझी कांहींच तशी आडकाठी नाही. पण एकच सूचना तुला द्यावीशी वाटते की अगदीं मित्र म्हणून तूं त्याच्याकडून काम घेऊं लागलास अन् इतर विषयीं बोलूं लागलास तर आजूबाजूच्या लोकात गैरसमज माजेल असं काही करूं नकोस, कळलं ना मी काय म्हणालो ते ? '

" हो, कळलं. सतीश, तूं सागतोस तें सारं मी आचरणात आणीन. "

सतीश माझ्या पाठीवर थाप मारीत म्हणाला ' ब्रेव्हो कामरेड. असे लोक पाहिजे आहेत. आमची पेट्टी ' बुझ्वा इन्स्टीक्ट ' मेल्याशिवाय नि मध्यम-वर्गीय नि संभावितपणाचे म्हणून समजल्या गेलेल्या मध्यमवर्गीय जीवनाचा त्याग केल्याशिवाय आम्ही कामगाराची संघटणा नि हातोडा–कोयत्याचं राज्य जमिनीवर आणूंच शकणार नाही. '

" पण सतीश, मध्यमवर्ग नि बुझ्वा हा प्रश्नच राहिला कुठं त्या क्रान्तींत ? मार्क्सनें एके ठिकाणी म्हटलं आहे कीं, ' मध्यम आणि पांढरपेशा वर्ग ही काही एक निराळी जात नव्हे–ही एक ऐहिक सुखाला लालचाव-लेली काहींशी मंडळी मानवतेत निराळी पडली आहे आणि याना मार्गावर आणायला याच्यावर आघात करण्याची गरजच नाही. कामगार आणि शेतकऱ्याचा लढा जेव्हा अगदीं तीव्र प्रमाणात उभा राहील आणि ते त्यागाची परिसीमा गाठतील तेव्हां, गाडीचीं पुढची चाकं फिरूं लागलीं असता मागच्या चाकाना गति घ्यावीच लागते किंवा फरफटत तरी जावं लागतं तसंच यांना भावी क्रान्तींत कोणता तरी एक मार्ग पत्करावाच लागेल. "

" तूं म्हणतोस तें अगदी बरोबर आहे. विशाल तळ्यांत पाण्यावर कुठंतरी दगड मारला तर तेवढीच वलयं उठतील आणि बाकीच्या जागेंत तोच संथपणा कायम राहील. पण साऱ्या ठिकाणी खळबळ माजविण्या-करितां जास्त प्रचार नि जास्त ओरडाओरड नको का करायला ? एवढंच काय पण लेनिनने सुद्धा एप्रिलच्या सभेंत पुढाऱ्यांना उद्देशून एक पत्रक काढलं होतं कीं, ' बहुजनसमाजात पांढरपेशा समाजाच्या डळमळीत वृत्तीपुढं त्यानीं आपल्या मजूरपक्षाची भूमिका स्पष्ट अन् बेडरपणानें सागि-

तली पाहिजे—समाजाच्या गळीं ती भूमिका निश्चित विचारसरणी पचवूनच त्याच्यावर आपलें वजन राखलं पाहिजे. आणि अशा प्रकारें एका लढ्या-पेक्षा दुसऱ्या लढ्यांना मजबूत एकजुटीनं तोंड दिलं पाहिजे. ”

‘ हो, आम्हीं पुढें उभारणारा लढा या युद्धाच्या धुमश्चक्रींत क्रांतीची नौबत वाजविल्याशिवाय राहील काय ? युद्ध जोरात आहे. साम्राज्यशाही-विरुद्ध रशिया युद्धात पडला आहे. हिटलरशी तात्पुरतं संधान साधून साम्राज्यशाहीचीं हाडं नि हाडं रगडून काढण्याचा त्यानं निर्धार केला अशा वेळेस ज्या साम्राज्यशाहीच्या गुलामी राजवटीत आम्ही माना खाली घालून झोंपलों आहोंत त्या माना स्वातंत्र्य आणि क्रान्ति याच्या बेभान हिम्मतीनं वर केल्या पाहिजेत. युद्धाची निकड, कामगारांवर उत्पादन करण्याची जबाबदारी, पण त्याना महागाई झाली असताना काहीही सवलत न देतां वर धमकेबाजी या सर्वांच्या अनुरोधान एक शह दिला पाहिजे. ’

सतीश जागेवरून उठत म्हणाला, ‘ शह दिला पाहिजे काय–देण्याची वेळ आली आहे. आता आपल्या जवळ एकच कार्यक्रम. मालकाच्या नफे-बाजीविरुद्ध मोहीम उठवणं. कामगाराना अधिकाधिक महागाई-भत्ता देण्याची मागणी करणं. तिकडे रामगढ कॉंग्रेसमध्यें वर्किंग कमिटीला जलद जलद स्वातंत्र्याची चळवळ चालू करण्याचा तगादा करणं आणि इकडे मजुराची नि विद्यार्थ्यांची अगदीं वेळेवर आणिबाणीच्या वेळेस त्याग करण्यासारखी मनं बनविणं हेच आपलं सध्याचं कार्य नि कार्यक्रम. ’

‘ सतीश, पण या माजणाऱ्या आन्दोलनात माझं सारसर्वस्व अर्पण करण्याची माझी अंतिम इच्छा असताना माझी अशी स्थिति झाली याबद्दल मला भारी वाईट वाटत आहे. ’

‘ त्याला इलाज नाही जयंत. फिनलण्ड प्रकरणापासून ब्रिटिश सर-कार खवळलं आहे. साम्राज्यशाहीचं हस्तक जे फिनलन्ड त्याला रशियानें हात घालताच त्याला आपल्या साऱ्या वसाहतीत कम्युनिझमची नासकी घाण येत आहे आणि ती दूर करण्याकरिता हळू हळू जे जे सापडतील ते ते कम्युनिस्ट काहीं ना काही कारणानें डिफेन्स ऑफ इण्डिया अॅक्ट-( भारतसंरक्षण कायदा ) खालीं जखडून ठेवणार आहे. ’

मी सतीशच्या खांद्यावर हात ठेऊन हिलवरून उतरत म्हणालों,

' अरे वा. भारताचं संरक्षण करण्याकरितां अज्ञातवासाचा कायदा आम्हीं केव्हांच पास करून घेतला आहे. '

' अरे हो जयंत, पण आपण जाणार आहोंत कुठं? बघ आतां पाऊण वाजण्याची वेळ आली आहे. तुला अज्ञात स्थळीं पोंहचवून देण्याची मला खबरदारी घ्यायची आहे. येथून दोघेजण चालत चालत सिमेंट-चाळीच्या भागांत पाच नंबरच्या चाळीपाशीं जावयाचे. तेथे मी खालीच उभा राहीन. त्या इमारतीत दुसऱ्या मजल्यावर तूं चढलास की अगदी कोपऱ्यांतल्या शेवटच्या उजव्या हाताच्या खोलीवर थाप ठोकायची तीनदा. दार उघडेल अन् आपल्या ओळखीपैकी कोणी कॉमरेड तुला आंत घेईल. तूं तिथं अगदीं कामगारासारखं वागावंस. त्याच्यात मिसळून जायला पाहिजे तुला. मग वेळोवेळीं जागा बदलण्याच्या तुला सूचना देण्यात येतील. उद्या तुझी पुस्तकें नि कपडे पाठवून देण्याची व्यवस्था करण्यात येईल. '

आम्ही बराच वेळ चालत होतों. तो नेईल त्या रस्त्यानं जात होतों. त्या सिमेंटच्या उंच उंच इमारती अंधाऱ्या रात्रींत खुलून दिसूं लागल्या.

त्या निर्भयपणे उंच उभ्या राहिलेल्या भिंती! जणूं काय आव्हान देत होत्या की, याद राखा या अंधाऱ्या रात्रीतून निघणारा प्रत्येक श्वास सुखाकरता आतुर झाला आहे. आज किंवा उद्या हे सारे श्वास एक होतील, एक प्रचंड वादळ माजवितील आणि या सिमेन्टसारख्याच त्याच्या समाजसत्तावादी कणखर मनोवृत्तीनं लाल बण्ड पुकारून अखिल हिंदुस्थानभर मजुराचं राज्य स्थापन करतील.

मी ही कल्पना सतीशला सागितली. तो हंसूं लागला आणि माझ्या पाठीवर हात ठेऊन काहीं बोलणार होता. पण त्याचं हंसू एकदम थांबलं. कारण लाबून दाणदाण काठी वाजवीत नि ' कोण आहे, कोण आहे ' असं म्हणत पोलीस येत होता.

लगबगीनं चार पाच पावलं पुढें येताच इमारतीकडे बोट दाखवून सतीश म्हणाला, ' हं चल तूं आपला मार्ग सुधार. '

लागलीच मीं त्याला विचारलं, ' अन् तूं? '

' मीही थोड्याशा अंतरावर एका कॉम्रेडकडे जाऊन झोपेंन अन्

सकाळीं घरीं जाईन. सारी काळजी घे अन् पत्रव्यवहार नि भेटी अगदीं लक्ष देऊन घेत जा.'

मी उत्साही मनोवृत्तींत पाय वळवीत सतीशला म्हणालों, 'अच्छा. Wish you red dreams Comrade!'

---

# १७

कम्युनिस्ट क्रांतीचीं आंदोलनं म्हणजे एका शरीराची बांधलेल्या साखळींतून सुटण्याची जणूं धडपडच. माझ्या अज्ञातवासाचे हे दिवस याच गोष्टीची मला पुरेपुर जाणीव करून देत होते.

साम्राज्यशाहीच्या युद्धामुळं साऱ्या राष्ट्रात धूमधडाका माजला होता. इंग्लंडच्या कम्युनिस्ट पार्टीचे जनरल सेक्रेटरी हॅरी पॉलीट, अमेरिकेचे अर्ल बार्डर अन् चीनचे लिओटस टंग यानीं आपआपल्या ठिकाणी साऱ्या मजूरवर्गात युद्धविरोधी पुकार करण्याची जय्यत तयारी करून टाकली होती अन् हिंदुस्थानचा प्रश्न जास्त धसास लावण्याची हीच वेळ आहे अशी मास्कोच्या आंतर्राष्ट्रीय कॉमीटर्नचे कॉ. जॉर्जी डिमिट्रिव्हनं पूर्णपणें संमति दिली होती.

आणि म्हणूनच क्रान्तीची शलाका चेतवायला हीच योग्य वेळ होती. कॉंग्रेसचं मार्चच्या महिन्यात अधिवेशन भरणार होतं अन् त्याला सबळ पाठबळ दाखविण्याकरिता तेथून चळवळीचं रणशिंग फुंकलं रे फुंकलं कीं मजुराच्या प्रचंड आन्दोलनावर ते पुढ सरकविण्यात येणार होते अन् त्याला अनुसरून मजुराच्या आर्थिक मागण्यांना राजकारणाचं स्वरूप देण्याकरितां चार मार्चपासून संप पुकारण्यात येणार होता.

ठिकठिकाणी चाळकमेट्या नेमण्यात आल्या होत्या अन् त्याना योग्य ते धडे देण्यात येत होते. काही काही गिरण्याचे भाग व विभाग पाडून त्यांवर निरोधन करण्याकरिता निरनिराळे कार्यकर्ते वाटून देण्यांत आले होते. आमच्या दृष्टीनं क्रान्तीची जय्यत तयारी एक झाली होती. राष्ट्रीय महासभेचा नुसता आदेश पुरे की झाली सरशी असा कार्यक्रम होता.

क्रान्तिकारक असणं हे सुंदर कार्यच आहे नाहीं का? पण तसं असताना आम्हाला क्रान्तीच्या वास्तवतेकडे डोळेझाक करून कसं चालेल? खऱ्या क्रान्तिकारकाला पहिली गोष्ट म्हणजे सद्यःस्थितीची जाणीव असली पाहिजे. आलेल्या परिस्थितीचा नीट विचार करून एक निर्णय काढला पाहिजे. पण पुन्हा परिस्थिति बदलली की मागचे विचार जीर्ण ठरून

नवीन मार्ग काढला पाहिजे. जर यशाची संधि जास्त प्रमाणांत मिळाली नाही तर माघार घेतली पाहिजे. पण त्याचबरोबर यशाची योग्य ती वाट शोधण्याकरितां सरळ पुढचा मार्ग सुधारला पाहिजे. मग त्या लढ्यात कांहींही होवो—त्याचा परिणाम कसाहि असो, आम्हीं तिकडे लक्ष न दिलं पाहिजे. त्यावर काही निर्बंध नाहींत. समेट, चळवळ किंवा प्रचंड लढाया कशातूनहि जावं लागलं तरी आपल्याला आपलं उद्दिष्ट लाभण्याशीं कारण.

पण महागाई-अधिवेशनानंतर मुम्बईच्या ट्रेड युनियन कॉंग्रेसमध्यें मजूर-पुढाऱ्याच्या नि मिल असोसिएशनच्या ज्या ज्या बैठकी झाल्या त्यांच्या सर्व वृत्तातावरून असंच दिसून आलं की, मुम्बईचे भांडवलदार अजून झोंपेत आहेत अन् मजुराचे न्याय्य हक्क देण्याच्या बाबतीत ते भीक घालायच्या गोष्टी बोलत आहेत. त्याना मजुराकडून भरपूर काम पाहिजे होतें पण महागाई-भत्ता मात्र पाकिटातून देणं जड वाटत होतं.

शेवटीं चवताळलेल्या जनसमुदायाने अन् शहरातल्या मजुरांनीं भयंकर शपथ घेतली याना ताळ्यावर आणण्याकरता. त्यानी युद्ध पुकारलं. साम्राज्यशाहीच्या ह्या हस्तकाना पुरेपूर दळून काढण्याकरिता त्यानीं आपल्या अस्तनीतील हत्यार उपसल.

साऱ्या मजुरानी आपल्या न्याय्य मागण्या पुन्हा एकदा पुढं केल्या अन् त्या जर स्वीकारल्या गेल्या नाहीत तर चार मार्चला चाळीस हजार मजूर संपावर जातील असं उघड उघड आव्हान दिलं.

× × ×

फेब्रुवारीच्या थंड रात्रि माझ्या शरीराला कापवीत होत्या. मी ज्याच्या खोलींत रहात होतो तो माझा जॉनी कॉम्रेड गोड गोड बोलून अन् मजुराच्या प्रचंड एकजुटीच्या सत्य गोष्टी सागून तशा थंडींतही मला ऊब आणून देत होता.

संजयही का तें कोण जाणे पण फारच उत्साही दिसत होता. तो आपला अहवाल येऊन सागत होता. 'महाराष्ट्र-युवकपरिषद्' भरविण्यात तो अगदीं गढून गेला होता. तो फारच गमती असल्यानं सर्वांच्या कामाचे अहवाल असे कांहीं देत असे की जणूं त्या त्या व्यक्ति माझ्यापुढं येऊन

उभ्याच आहेत असं वाटे.

त्यानं, दादरच्या धुरू हॉलमध्ये युवक परिषदेच्या निवडणुकीकरितां भरलेल्या सभेंत हिंदुमहासभावाल्या लोकानीं केलेल्या दंगलीची नि त्यांना चांगलं जिरवल्याची कथा मला सुनावली. या सर्व तरुणानी मग किती शिस्तींत अन् केव्हढ्या उत्साहानं सी. के. पी. हॉलमध्ये निवडणूक घडवून आणली तें मला सागितलं. शिवाजीपार्कवर मला मोठा पेंडॉल बाधला असल्याचं त्यानं मला कळविलं.

नेहरूंना दिलेलं आमंत्रण अन् काही कार्यक्रम जेव्हा मीं ऐकले तेव्हां तर मी थक्कच झालों. मला वाटलं तिकडे रामगड कॉंग्रेस भरण्याच्या आधीं यानीं स्वातंत्र्याचा पुकार करून पुरेवाट केली आहे. तरुण विद्यार्थी राष्ट्राचे रणगाडे आहेत. तिकडे मजूर जोरात. तरुण विद्यार्थी साथ द्यायला तयार पण एका आदेशाची तयारी. साऱ्या साऱ्याचे डोळे रामगढ कॉंग्रेसच्या अधिवेशनाकडे लागले होते यात नवल तें काय ?

आजच्या दैनंदिन जीवनांत वास्तवतेच्या तुफानी ज्वालाची आच लागूं लागली आहे. प्रत्येकाला असं वाटूं लागलं आहे कीं, राजकारण खेळ खेळण्याची कला, ही खरी क्रान्तिकारक अन् सत्यसृष्टीत आणतां येईल अशी सोपी गोष्ट आहे. कारण जीवनानें त्रस्त झालेल्या लोकांपुढें हाच प्रश्न आहे. या साखळदंडातून पार सुटण्याकरिता अन् ही आम्हांला लागलेली आच दूर सारण्याकरिता एकच गोष्ट अन् ती म्हणजे राजकीय कर्तव्य. त्या शिवाय सारं व्यर्थ आहे. स्वातंत्र्याशिवाय जगणारं जीवन म्हणजे जगण्याशीं प्रतारणा करणं आहे.

आणि ह्या सर्व पार्श्वभूमीवर मला किती रम्य स्वप्ने पडत होतीं ! झेंड्याच्या खालीं उभा राहून मी भाषण करीत आहें. चाळीस हजार मजूर एकमेव शाततेनं ते ऐकत आहेत. डेनची नजर माझ्यावर गोड अमृतधारा वहावत आहे पण लागलीच माझी ती तंद्री उघडत असे. मला लागलीच त्या ठिकाणीं निर्जल प्रदेश दिसत असे. त्यात सगळीकडून असाचे रागीट डोळे माझ्यावर ठायीं ठायीं उगारलेले दिसत असत अन् मी कुठें तरी पर्णहीन झाडाखालीं उभा आहें असा मला भास होत असे. ह्या विरोधी स्वप्नांचा मला काही उलगडा होईना. मला वाटलं मानसशास्त्राला अनु-

सरून एकाबद्दल प्रेम अन् दुसऱ्याबद्दल फक्त आसक्ति ! पण त्या व्यक्तीला आपल्या सहवासाची आवड एव्हढाच हेतु असेल याचा. ह्या स्वप्नाचा आपल्या सत्यसृष्टींतील जीवनाशी कोणता संबंध आहे ? साऱ्या जीवनाच्या पलीकडे माझं सध्याचं आयुष्य आहे. डेनला मी मधें भेटलों होतों पण असाला भेटण्याची इच्छा असतांनाहि टाळली अन् त्याचं प्रतीक म्हणून तर तें स्वप्न पडलं नसेल ना ? अन् समजा भेटण्याचं ठरविलं तर किती अडचणी येतील ? अन् बरं तरी पण त्यातून निष्पत्ति अशी काय होणार ? अशा ह्या विचाराच्या घालमेलीत रजनीचे पाढरी पांढरीं छिद्रें पडलेले काळेकुट्ट पडदे दूरदूर सरले जात होते.

---

# १८

'संजय, अरे तुझीच तर वाट पहात होतों. एक काम करशील माझं ?'

'काय रे बुवा ? काहीं विशेष ? अन् हें काय ? जयंत आज तर तूं क्लीन शेव केलेला नि ह्या संपादकाच्या वेषात जर कुणी तुला बघितलं तर......'

'नाही रे. कोण बघतो मला ? एक काम कर. जीवनदास श्रॉफला एक चिठ्ठी दे नेऊन अन् हे बघ त्याना म्हणावं गाडीवर ड्रायव्हर पाठवाल तो ओळखीचा पाठवा. बरं हं.'

'म्हणजे, जयंत तूं एवढ धाडस करून जाणार आहेस तरी कुठं ? आपले पुढारी मोटारी घेऊन फिरतात त्यांच्या नंबराची सर्व यादी एक दिवशी मला विश्राम दाते जवळ दिसली. म्हणून मी सहज विचारलं तुला तसं.'

'हे काय म्हणतोस तूं संजय. नंबराची यादी अन् ती विश्राम दातेनं आपल्याजवळ ठेवण्याचा अर्थाअर्थी काही संबंध ?'

'जयंत, त्याच्याबद्दल आताशी मला भीति वाटूं लागली आहे. तुला माहित आहे, परवा गिरगावच्या कोना रेस्टॉरन्टमध्ये विश्राम दातेला नि असावरीचा भाऊ भैरव धनंजयला मी हेरून ठेवलं अगदी खूपखूप उकळत्या गप्पा मारीत असतांना.'

'अस्सं ! संजय, ही बातमी कळवलीस तूं सतीशला अन् काय रे असावरी तर खूप काम करते ना राजकीय भागात ?'

"हो. ती खूप काम करते जयंत. तिची कळकळ नि काम घेण्याची जबाबदारी यावरून ती मला वाटतं एक विख्यात कार्यकर्त्री होईल. ती नेहमी म्हणते, 'जयंत जर माझ्या आयुष्यात भेटले नसते तर मी या राजकीय सुखाच्या केव्हढ्या मोठ्या सुखाला आचवले असते !' "

मीं चार-मिनार सिगारेटचा धूर सोडीत म्हटलं, 'हं ! राजकीय सुख ! बरीच कल्पना दिसते तिच्या निरनिराळ्या सुखाची. पण संजय, आता रात्र होत चालली आहे. तूं काहीहि विलंब न करता ही जबाबदारी

पार पाड अन् हें बघ सतीशलाहि कळव. अहं पण नको. सध्या त्याची कांहीं जरुरी नाही. पण उद्या मात्र श्रॉफजीच्या बंगल्यावर भेट रात्रीं याच वेळेला.'

संजय निघून गेल्यावर मी डोक्यावर हात ठेऊन विचारच करीत बसलों. अन्नाचा नि माझा पत्रव्यवहार चालत होता. राजकीय दृष्टीनं ती भारी खंबीर बनत चालली होती. माझी भेट घेण्याचा तिनं अगदीं अट्टाहास घेतला होता. पण सजयच्या आताच्या सागण्यावरून मला तिला भेटण्याची भिती वाटूं लागली. त्याचा काय नेम. स्त्रीजात हे एक न उलगडणारं कोडं आहे, याचा प्रत्यय मला तिच्या इथं आला तर! पण तिनं आज मला इतकं आर्जवाने बोलावलं होतं की त्याला मी नकार देणं शक्य नव्हतं. उद्या सुरू होणाऱ्या लढ्याच्या आधी तिला माझी भेट पाहिजे होती. माझ्या गुप्त भेटीची तिला जाणीव होती अन् एक दिवस नि एक रात्र कुणालाहि न कळविता आपल्या बंगल्यात ठेवण्याचं तिनं वचन दिलं होतं.

ती तीन मार्चची रात्र होती. मजुराना सपाच्या पूर्वीची पहिली रात्र म्हणजे करबल्याच्या रात्रीसारखी असते. सारे कार्यकर्ते, गिरणीकामगार युनिअनच्या ऑफिसात काही झोपण्याकरिता तर काही आपलं काय काम आहे तें विचारण्याकरिता निघून गेले होते. चार मार्चला चार वाजताच त्याना मिलच्या दारावर निरोधन करण्याकरिता जावं लागणार होत.

तीन दिवस आधी सतीश मला येऊन भेटला होता. तेव्हा तो म्हणाला, 'जयंत, आता संप पुकारला गेला आहे अन् तो सुरू होताच पुढाऱ्यावर सरकारची धाड आल्यावाचून रहाणार नाही. कामगार-कार्यकर्त्यांचे पत्ते काढल्याशिवाय भाडवलदार राहणार नाहीत पण अशा वेळेस अज्ञातवासात राहणाऱ्या कार्यकर्त्यांनी अशाच ठिकाणी राहिलं पाहिजे की जिथं आश्रय घेतला तर सरकारला तर संशय न आला पाहिजे अन् मजूर पुढारी धरले गेले तर त्याच्या मागे त्याच्या कार्याचा दोर तर आपल्या हातात आला पाहिजे.'

ती चार मार्चची पहाट होती. आभाळात चादण्या खुलून दिसत होत्या. पण त्या बघण्याकरता सुद्धा माझे डोळे निस्तेज झाले होते. मजु-

रांचा गटागटानं रस्त्यावरून चालण्याचा आवाज येत होता. मोठमोठ्या लॉऱ्या लाल झेंडा फडकावीत अन् जयघोष करीत मजुराच्या चाळीतून फिरत होत्या. सगळीकडे अगदी उत्साहाचं वातावरण होतं. पण माझं शरीर विकल झालं होतं–जणूं काय मला वाटूं लागलं दुसऱ्या असंख्य जीवाना उत्साह मीच दिला आहे अन् माझ्याजवळ आता काहीच शिल्लक नाही.

पायीं भटकत भटकत अन् गुलाबी थंडीची मजा लुटीत मी लपत लपत डिलाईल रोडपर्यंत आलो होतों.

मला आठवण झाली. माझी रात्रीची सैल सुरवार निघून जाऊन तिथं असाच्या रात्रीच्या पोषाखानं–पायजाम्यानं जागा घेतली होती. तिचा तो पायजमा माझा लांब सदरा गुढघ्यापर्यंत येत होता म्हणून प्रदर्शनाची आपत्ति वांचली. मी चेहऱ्यावर असाची मफलर घट्ट बांधली होती. त्यावरून हात फिरवताना अजूनहि मला असाचं तारुण्यसुलभ शरीर लुटण्याची आठवण होत होती पण असाचे शेवटचे उद्गारहि मला त्याच क्षणीं ऐकूं येत होते. ' जयंत, जयंत, मी दोषी नाही रे ! मला क्षमा कर ! भैरव येईल हें मला माहीत नव्हतं. तूं नको ना पळून जाऊं. पण जा. जा ना. मीहि बघ हा झेंडा घेऊन निरोधनाला जात आहें. किती उत्साह दिला आहेस आज. मी प्रतिज्ञा घेत आहें. तूं जा. तुझ्यामागें मी तुझी जागा घेईन. ज्या जागेनं तुला माझ्या फसवेगिरीची जागा आणून दिली तिचा मी संबंध जीवनभर त्याग करीन. '

मला सगळ्या गोष्टींपेक्षा भिती वाटत होती भवितव्याची अन् असानं केलेल्या ह्या प्रतिज्ञेची. आता मी काय करूं ? मला सगळीकडे अन्धार भासूं लागला अन् त्या अन्धारात असा नि डेनचे चेहरे तरंगत आहेत असा मला भास होत होता. माझ्या ग्लानि आलेल्या शरीरानं मला चालवेना. एका अगदी कोंदट अन् कुंद हॉटेलचा मीं आसरा घेतला.

× × ×

ऑफजीच्या मोटारीतून मी रात्रीं जो निघालों तो असाच्या बंगल्यापासून बऱ्याच लांबवर आलो. नन्तर ड्रायव्हरला मोटार परत नेण्यास सांगून मी असाच्या बंगल्याच्या पोर्चमध्यें येऊन दाखल झालों. विश्राम

व धनंजय येथेंच होते. भैरव म्हणून जो कोणी प्राणी होता तो बापाच्या येथेंच रहात नव्हता. बॅरिस्टर धनंजय असाच्या वैयक्तिक बाबतीत लक्ष घालीत नव्हते पण त्यांना राजकारण जरा रेचकासारखें वाटत असल्यामुळं ते तें टाळीत असत. पण असाचीही मतं बदललेली आहेत एव्हढंच काय पण ती प्रत्यक्ष काम करीत आहे हे त्याना कळायला मार्ग नव्हता. बापाचा अन् मुलीचा रहात्या बंगल्यात एकत्र येण्याचा फारच कमी संभव होता.

मी थेट बंगल्यांत शिरून असाच्या खोलीत गेलो. मी जात असतांना त्या गड्याची मुद्रा जरा कावरीबावरी दिसली. पण त्याला माझं प्रत्यक्ष काय काम असावं हें विचारण्याची हिमत झाली नाही.

मी आत जाताच, असा चकित होऊन माझ्याकडे बघूं लागली अन् म्हणाली, ‘ अय्या ! म्हणजे तूं अकराला येणार होतास अन् आता तर दहा वाजले आहेत. पण जयंत तूं आलास म्हणून किती आनन्द होत आहे ! ’

मीं सरळ खुर्चीवर जाऊन बसत म्हटलं, ‘ तर तूं अगदी माझी वाट बघतच बसली होतीस ना ? मला अंतर्मनाची साद कळते ! ’

‘ अरे वा ! ही आतल्या नि बाहेरच्या मनाची साद हे काय भारूड आहे ? अज्ञातवास म्हणजे तपश्चर्याच तर नव्हे साधूची भाषा बोलायला ? ’

पण आता असाला उत्तर देण्यापेक्षा मी तिच्याकडे सारखा बघूं लागलों होतों. तिच्या अंग सावरण्याच्या नि होता होईल तों माझ्याकडे पाठ करून बोलण्याच्या हालचालीनं ती बाथरूममध्यें जाण्याच्या तयारींत सज्ज झालेली दिसत होती. तिचे लांबलचक गौर मासल दण्ड ब्लाऊझ न पेहर-लेल्या वक्ष:स्थलाची आकर्षकता वाढवीत होते. तिच्या थिट्या केसाचा पिवळी रिबन लावलेला शेपटा तिच्या मानेच्या सुन्दर हेलकाव्यासरशीं अगदी ठराविक गति घेणाऱ्या घड्याळाच्या पेंडोलमसारखा भासत होता. तिच्या चेहऱ्यावर आलेल्या घामाच्या ओलेपणानं दिव्यात चेहऱ्याचा थोडासा भाग चमकत होता.

मला वाटतं माझी ही साधुपणाची दृष्टि तिनं ओळखली म्हणूनच कीं काय तिनं एका खांद्यावरचा टॉवेल ओढून त्याच्या मधल्या भागानं वक्ष:स्थळ झांकलें अन् माझ्यासमोर साबणाची वडी नाचवीत म्हणाली, ‘ जयंत, जरा बस ना इथं. तीन दिवसापासून मला स्नान मिळालं नाहीं

अन् आता उद्यांपासून तर लढाच सुरू होणार आहे. माहीत नाहीं पुन्हा असं सुन्दर स्नान केव्हां मिळेल तें. बस. मी येतें हं आतांच.'

असं म्हणून ती घाईघाईनं दारातून जातांच टॉवेलचा एक पदर पडलाच खालीं अन् त्याच सरशी असाचं सारं यौवन ज्यात सांठविलेलं होतें अशा त्या दोन घटाची, समुद्राच्या एखाद्या लाटेनं बराचशा वेळानं सळकण वर यावं नि लुप्त व्हावं तशी हालचाल झाली. पण असाची ती आवरताना व तेथून निघून जाताना कोण तारांबळ उडाली!

मी अगदीं उत्कटतेच्या दाट मदानं बाथरूमच्या बाजूला जात असलेल्या त्या कमनीय बालेकडे बघतच राहिलो एकसारखा.

एकट्या असाच्या बाबतीतच मला एव्हढी आसक्ति कां वाटावी हेंच कळेना. शिरीनच्या शरीराचं गाढ आलिंगन मला नकोसं वाटलं; डेनच्या बाजूला माझ्या मनाचे पैलू फिरत असताना देखील अन् तिनं कितीदा तरी विनवण्या केल्या असताहि मला तिच्या सहवासात, चंद्राचं चादणं लुटण्यात जी मौज असते-मजा वाटते, त्यापेक्षा कोणतीच भावना वाटली नाहीं. पण असाच्या बाबतीत, सुन्दर फुलाचा गुच्छ हातात येताच काय करूं नि कुठ ठेवूं, किती सुगन्ध लुटूं नि किती नको अशी जी अनिवार इच्छा होते तशा प्रकारची लालसा मला तिच्या ठिकाणीं वाटूं लागली होती.

पण काय असेल कुणास ठाऊक. जगात सत्तावीस वर्षें काढलेल्या माझ्या शरीराला आज कुणाची तरी अगदीं ओढ-दाट दाट आलिंगन द्यायची ओढ-लागली होती. माझ्या साऱ्या वृत्ति एकदम वर उफाळत होत्या. मला काहीच सुचेना. मी गंभीरतेचा विचार करून पाहिला पण तो टिकेना. असावरीच्या टेबलावरील मार्किस्ट पुस्तकांशी चाळा केला पण त्यांतही मला काही मजा वाटेना. बाजूच्या खिडकींतून एखादीच थंड झुळूक अंगाला झोंबत होती पण त्याहीपेक्षा मला त्याच त्याच गोष्टीची सारखी ओढ वाटूं लागली होती.

मीं निश्चय केला. आतां आपण येथून सुटका केलीच पाहिजे. कारण मला असम्मत असे श्वास माझ्या शरीरातून निघत होते अन् छातीत सुन्न सुन्न अशी सुखद संवेदना होऊं लागली होती. या मोहवश प्रसंगाला न

भुल्लं आतां आवण असा येतांच तिचा निरोप घेऊं असा विचार मीं केला. परन्तु तो मजकडून अमलात न येतां मीं प्रित्तचं 'Must the war spread' हें पुस्तक हातांत घेऊन तिच्या येण्याची वाट बघत खुर्चीत बसलों.

असा खोलींत आली.

मी सरळ तिच्याकडे दृष्टिक्षेप करून आता मी येथून जातों असं तिला कळविणार तोंच तिच्या पोषाकानं माझा दृष्टिभेद केला अन् साऱ्या नेत्रतेजाचं तिथेंच केंद्रीभवन झालं.

अन् त्या मोहक पोषाखानं आधींच उठलेल्या वृत्तीना अधिकच उंच उंच नेलं.

तिनं पाढऱ्या सिल्कचा एक समोरून बटनं नसलेला तलम अन् अगदीं ढिला सदरा घातला होता अन् त्यातून असाचे नाजूक पण भरीव असे वलय अस्पष्टपणे दिसत होते. सदऱ्याच्या खाली तशाच तलम कापडाचा पायजमा चढविला होता.

किती मोहक दिसत होती ती त्या पोषाखांत! मदनाला कामोत्सुक करणारी मेदिनीच वाटली ती मला.

पण मी घाबरलों.

घाबरलों तो तिच्या प्रश्नानं. 'जयंत तुला काय वाटतं? काय दिसत नाहीं मी सुन्दर या पोषाखात?'

मी तिचा कल बघून म्हणालों, 'हो तर! म्हणतात ना 'जातीच्या सुन्दराना काहीही शोभतं' म्हणून.'

ती हंसली अन् डोळे मिचकावीत म्हणाली, 'तरीच. स्वतःवरून बरीच दुसऱ्याची परीक्षा करता येते.' अन् पुढे म्हणाली, 'हो, आली आहे खरी उद्यांपासून माझी खरी परीक्षेची वेळ. नाही का जयंत.'

असा टेबलावरील पुस्तकें नीट करीत होती अन् एकीकडे मला आपला वृत्तात सागत होती.

तिच्या गड्यानं पूर्वीच्याच कावऱ्याबावऱ्या नजरेनं माझ्या पुढ्यांत जेवण्याचं सर्व मांडून ठेवलं होतं अन् तो पसार झाला होता.

ती छाती जरा पुढे काढीत नि टेबलाजवळील खुर्ची डिनर-टेबला-

जवळ सरकवीत म्हणाली, ' हं चल, मारूं या ताव आतां. किती भूक लागली आहे मला. जयंत आज मला नंदिनीनं खूपखूप भटकविलं. बघ तूं म्हणत होतास ना की नंदिनी खूप अवखळ आहे. पण शेवटीं तिच्या कलानं घेऊन तिला आपल्या पार्टीच्या शिस्तीखाली लावलंच कीं नाहीं काम करायला मी ? उद्या सुरू होणाऱ्या लढ्यांत स्त्रिया आघाडी मारणार आहेत, आहे माहीत तुला ? लेनिननं म्हटलं आहे ना Every kitchen-maid must learn to rule the state याचा श्रीगणेशा होणार आहे उद्या-पासून सुरू कामगार–विभागात. '

किती उत्साहानं शरीराला मोहक हेलकावे देत ती एक एक वाक्य बोलत होती ! अन् सागताना तिचा तो खट्याळ सदरा आगेमागे सरकून आपल्या मालकिणीचं सौंदर्य दाखविण्याचा काय पण आटोकाट प्रयत्न करीत होता !

बरेच दिवसांनीं सुग्रास अन्न मिळाल्यामुळें मी जेवण्याचा तडाखा लावला होता. जेवण संपताच असा खुर्चीत येऊन नि माझा हात आपल्या हातात घेऊन म्हणाली, ' चल ना जरा भटकून येऊं या थोड्याशा अंतरापर्यंत ? '

रस्त्यात असेपर्यंत माझं नाव न उच्चारण्याची सूचना देऊन तिच्या बाहूंत माझा बाहु देत तिची विनंति मी मान्य केली.

मला फार उशीरा कळलं. असाकडे ज्या रितीनं माझं लक्ष वेधलं गेलं होतं त्याकडे तिचाहि अणूरेणु ओढ घेत असलेला दिसत होता. रस्त्या-तून लवकरच फिरून येईपर्यंत आम्हा दोघानाही कळलं कीं गंभीर संभाषणावर नि तृतीयपुरुषी अनेकवचनावर बोलण्याचा आम्हा दोघानाहि धीर नव्हता. हाताला हात दाबीत नि शरीराचे अवयव एकमेकाना चाटून दोघांचाही साकार आत्मा प्रगटता दाखवीत होता. दोघाचीं मनें म्हणूं लागलीं आम्ही एक. शरीरं म्हणूं लागलीं आम्ही एक. अन् चेहऱ्याचं मीलन पटवूं लागलं एकतेंत विलीन झाल्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं.

खोलींत येतांच असानं दोन दुधाचे प्याले जवळ ठेवले अन् खाड-कन् दार आतून बन्द केल्याचा आवाज माझ्या कानांवर आला ! साऱ्या शांततेंत पृथ्वीच्या खोल दरींत अतीव एकातांत आम्ही कोण आहोंत न् काय करीत

आहोंत याचं भान राहिलं नाहीं.

प्रकाश मालवला गेला. मूकमूक वेदना विव्हळ होऊं लागल्या. असाच्या गोड गोड आलिंगनानं सुरवार पायांतून निघून गेली. असाच्या मऊमऊ मासल भागावर स्पर्श करतांच स्त्रीच्या अननुभूत सुखाची माधुरी माझ्या हृदयात लकलकाट करूं लागली. एका गाढ नि निराकार समाधीत मी अगदीं एकरूप झालों. साऱ्या सुखाच्या परमोच्च बिंदूवर असाबरोबर मी वहावत जाऊं लागलो.

× × ×

नीरव शांततेंतून निघणाऱ्या मोटारच्या हार्ननं मी सुखसमाधीतून जागा झालो अन् अगदी जवळ जवळ बुटाचा खाडखाड आवाज येताच पूर्णपणें जागा झालों.

जवळच्या दिवाणखान्यात मोठमोठ्यानं संभाषणं होऊं लागलीं.

असा मादक नशा भरलेल्या डोळ्यानं उठली अन् काही भान न राहता तिनं दिवा लावला.

दिवा लावताच जातिवंत सोन्याचा रंग चकाकून दिसावा तशी माझ्या नयनाला असाची रंगकान्ति दिसली.

मी हंसऱ्या नयनानं तिच्याकडे पहात आहें असं कळताच तिला आपली चूक कळली अन् सरळ दिवा सटकन् बंद करून पुटपुटली ‘ बराच आहेस कीं रे जयंत. ’ असं म्हणून तिने कपडे घालण्यास सुरवात केली.

पण या गडबडींत आमच्या पायजम्याची अलदाबदल झाली.

‘ बाबा, बाबा, मी म्हणतों रात्र जरी असली तरी खाली या. आज या साऱ्या गोष्टीचा सोक्षमोक्ष असा झालाच पाहिजे ! ’

हा बाहेरून आवाज येतांच असा दिवा लावून मला बिलगत म्हणाली, ‘ जयंत मला क्षमा कर पण इथं तुला दगा आहे. भैरव आजही असाच नेहमीप्रमाणं अपरात्रीं आला आहे. तो मधून मधून खूप खूप पितो अन् वारयोषितांना घेऊन बाबांकडे येतो. त्याला अशी वेड्याची लहर येते. आतां हा येथें आला आहे. आतां तो बाबांजवळ इस्टेटीचा हक्क मागेल. कामगार-चळवळींत भाग घेतल्यापासून त्यानं मला त्राहि

त्राहि करून सोडलं आहे.’

‘ असा बोलव तूं त्याला खोलींत. रगडून टाकतों त्याची चामडी. ’ मी असाला धीर देत बोललों.

अप्रत्यक्षपणे हा घडून आलेला प्रसंग बघून मी तर हतबुद्ध झालों. त्यांच्या कौटुंबिक भानगडीत मी कसा भाग घेणार ! पण तो काय बडबड करीत आहे हें तर ऐकूं असा सल्ला देत आम्ही तें ऐकूं लागलो.

या वेळात बॅ. धनंजय खालीं उतरले होते. ते मोठ्यानं म्हणत होते, ‘ अरे भैरव इतक्या पहाटे तुझी काय भानगड आहे तें तर कळूं दे. ’

आम्हाला त्याचा आवाज स्पष्ट ऐकूं आला. भैरव म्हणत होता, ‘ बाबा मी काही पिऊन आलों नाहीं किंवा मुलीना बरोबर घेऊन आलों नाही. माझी सरकारी कामगिरी बजवायला मी आलो आहे ती मला बजावूं द्या. कुठं आहे असा ? तिनं एका राजकीय गुन्हेगाराला लपवून ठेवलं आहे असा रिपोर्ट मिळाला आहे. हा मी अस्सा तिच्या खोलीवर जाऊन तिला जाब विचारीत आहे. कामगाराच्या चळवळीत भाग घ्यायला कुणी सागितलं हिला ? सख्या भावाला अशा पेचात आणण्याची दुर्बुद्धि तरी कशी झाली हिला ’ असं म्हणत त्याचा खाडखाड जोडे वाजविण्याचा आवाज मला ऐकूं आला.

मी घाबरून गेलों. असाला गाढ अलिगन देत म्हटलं, ‘ असा तूं वाईट आहेस असं मी तरी कसं म्हणूं ? पण हाच आपल्या मीलनाचा शेवट नि अत. ’

पण माझ्या तोडून अनिच्छेनं निघणारे हे बोल ऐकून थोड्या वेळा-पूर्वी आनदानं पुलकित झालेली असा रडूं लागली. मला घट्ट घट्ट आलिगन देत ती म्हणाली, ‘ जयंत, माझी चूक नाही. अगदी खरं सांगतें. माझा यांत संबंध नाही. माझ्यावर विश्वास ठेव. ’

मी अगदी त्रस्त होत म्हटलं, ‘ माफ कर, असा. तूं आज दिलेलं सुख जन्मात विसरणार. नाही पण......? ’

‘ पण–पण काय जयंत? एक क्षण थाब. भैरव या खोलीत येणार नाहीं. माझी रोजची झोंपण्याची नि अभ्यासाची खोली निराळी आहे. तिला मीं कुलपें लावली आहेत. ही पाहुण्याची खोली आहे. जरा थांब ना. ’

दिव्याच्या प्रकाशांत असाचा चेहरा पवित्र, प्रसन्न नि मंगल असा मला दिसला. निष्पापता नि सरलता तिच्या चेहऱ्यावर चमकत होती.

ती मफलर देत मला म्हणाली, 'जयंत, जा, जा तूं. तुझा मार्ग सुखाचा होवो. या खिडकींतून तूं निघून जा. तळमजल्याची खोली आहे. तुला इजा होणार नाहीं. पण थांब एक क्षण.' त्या क्षणाची पुन्हा आठवण म्हणून......तिनं आपले अधर माझ्या ओठावर ठेवले. बुटाचा खाडखाड आवाज ऐकूं येताच ती म्हणाली, 'जा आपण पुन्हा भेटूं. तुझ्या कार्याला. ....'

'मी प्रतिज्ञा घेत आहे जयंत. आता माझ्यावर येणारं कौटुंबिक संकट मी ओळखून आहे. त्याला मी तोंड देईन. माझ्या कृतीनं मी त्या महत्तम कार्याकरिता माझं बलिदान देईन. तुझ्या विश्वासास पात्र होईन.'

तिच्या धीरोदात्त उद्गारलेल्या या वाक्यानं माझे अणुरेणू एकत्रित झाले अन् मी स्वतःच असाला जवळ ओढून तिचं एक अविनाशी चुंबन घेतलं.

दारावर खड्खड् अन् 'असा, ए असा,' असा आवाज येताच मी असाला दाराकडे सारीत खिडकीवर लाथ मारली अन् पोर्चच्या मागच्या बाजूनं एका गल्लीत घुसलो.

सकाळी दूध वाटणाऱ्या भय्याच्या ताड्यात मी सामील झालो अन् त्याच्याशी मिनतवारी करून दुधवाल्या भय्याचं सोंग आणलं.

आधीच कमकुवत झालेलं माझं शरीर जास्त जास्त गलितगात्र बनत चाललं होतं. आडवळणानीं वळणं घेत घेत बराच लांब आल्यावर मी रस्त्यावर एकटा चालूं लागलो. कुठं जाणार हे निश्चित नव्हतं. वरळीच्या रस्त्याला लागेपर्यंत समुद्राकडून येणारा वारा शरीराला कापवीत होता आणि ठिकाणावर जाईपर्यंत किट्सच्या कवितेंतल्या ओळीची सारखी आठवण होत होती.

Oh ! what ails the knight at arms,
Alone and palely loitering ?
The sage is the withered from the lake
And no birds sing.

# ११

मुंबईच्या सत्याऐंशी गिरण्याचे भोंगे रोज सकाळीं कर्णकर्कश आवाज काढून निष्कारण धूर सोडीत होते. त्या भोंग्याच्या आवाजानं सारा भाडवलदार वर्ग एका आवाजानं साम्राज्यशाहीपुढें धाय मोकलून रडत होता कीं ' आता सारे मजूर संपावर आहेत. आम्हाला युद्धोत्पादन करतां येत नाहीं. ' गिरण्यातून निघणाऱ्या त्या धुरानं साम्राज्यशाहीच्या हस्त-काचे डोळ्यांवर आवरण आल्यामुळं मदाध होऊन त्यानी मजुरावर अत्या-चार करायला सुरवात केली होती.

मिलच्या प्रत्येक दारावर निरोधन करण्याकरिता स्त्रिया उभ्या होत्या. स्त्रिया आघाडीवर आलेल्या पहाताच प्रत्येक कामगाराचं रक्त बोल्शेविक बाण्यानं वर सळसळून येत होत पण या क्रातीच्या शूर शिपायावर पोलि-सांची मजल त्यांना मारहाण करीपर्यंत जाऊं लागली होती. मुंबईच्या मोठमोठ्या भर रस्त्यावर मजुराचे ताडेच्या ताडे प्रचार-लॉरीतील मायक्रो-फोनमधून साऱ्या शहरातल्या कोनाकोपऱ्यातून—

**उठो जागो भूखे बन्दी,**
**अब खींचो लाल तरवार !**
**कबतक सहोगे भाई,**
**ज़ालिम का अत्याचार !**
**तुम्हारे रक्तसे रंजित क्रन्दन,**
**अब दश-दिश लाया रंग !**
**ये सौ बरस के बन्धन,**
**एक करेंगे भंग !**
**यह अंतिम जंग है, जिसको**
**जीतेंगे हम एक साथ !**
**गाओ इन्टरनात्स्योनाल,**
**भव स्वतंत्रताका गान......**

यह अंतिम जंग है, जिसको
जीतेंगे हम एक साथ।
गाओ इन्टरनात्स्योनाल,
भव स्वतंत्रताका गान......

हें आन्तरार्ष्ट्रीय गीत म्हणत, आपल्याबरोबर हजारों दुसऱ्या कामगार-बंधूंना घेऊन एक मोठा पुढें पुढें प्रगति करणारा लोखंडी मोर्चा घेऊन त्या लोह-चुंबकाकडे जात होते.

तो लोहचुंबक मुंबईच्या मोठ्या मैदानावर एका उंच बांबूला बांधून ठेवला होता. हातोड्या कोयत्याचं लाल निशाण फडकत होतं.

तिथं हा प्रचंड लोखंडी मोर्चा विरोधी सत्तेवर घाव घालण्याकरिता अफाट अन् विस्तीर्ण मैदान व्यापून टाकीत होता.

सतत व्याख्यानाच्या आगीनं हें लोखंड तिथं विरघळलं जात होतं. स्वतंत्रतेच्या अन् समानतेच्या मानवी हक्कासाठी विरोधी सत्तेवर प्रहार करण्याकरिता त्याची मूस तयार होत होती.

आजपर्यंतच्या हिंदुस्थानच्या कामगार क्रांतीचा अभूतपूर्व असा हा लढा तेरा दिवस पर्यंत लढला जात होता. कॉंग्रेसचं अधिवेशन जवळ आलं होतं. ह्या दरम्यान फिन्लंड व रशियाची मैत्री झाली होती अन् फिन्लंडमध्यें कम्युनिस्ट क्रांतीची मोहीम सुरू झाली होती. साम्राज्यशाही सरकारचं तिथं भेडोळं फुटलं. फिन्लंडच्या जनतेनं दोस्त राष्ट्राच्या पोकळ मदतीच्या आश्वासनाना धूळ दाखविली त्यामुळं साम्राज्यशाही सरकार खूप खवळलं. इकडे एकाच वेळेस निरनिराळ्या प्रान्तात अन् प्रमुख शहरांत कामगाराचे संप, विद्यार्थ्यांच्या वाढत्या चळवळी अन् कॉंग्रेसचं लढाईला आमंत्रण देणारं अधिवेशन भरणार हें बघून सरकारनं साऱ्या कम्युनिस्ट पुढाऱ्यांना जनतेंतून उचलायला सुरवात केली. त्याची पहिली पाळी मुंबईवर आली. मार्चच्या दुसऱ्या आठवड्यात मुंबईतल्या चार प्रमुख कम्युनिस्ट पुढाऱ्याना पकडण्यात आलं.

वर्गयुद्धाच्या लढ्यांत प्रगमनशील कामगारवर्ग नेहमींच प्रगति करीत असतो. तो मागें हटत नाहीं. एकाची जागा दुसरे घेतात. सारेजण त्या

लढ्याला पुढें पुढें ओढतात. दोन प्रचंड परस्पर विरोधी गोष्टी पुढें आल्या कीं मग त्यांतून एक प्रभावी शक्ति बाहेर पडते.

पुढाऱ्यांच्या धरपकडीनं अन् वाढत्या अत्याचारानं लाव्हासारखा उकळणारा लोखंडी रस दुप्पट वेगानं सळसळून येऊं लागला. एक आदेश अन् एक हांक पुरे की त्या प्रचंड वेगवान् शक्तीनं न आवरला जाणारा हा कामगार वर्ग प्रतिस्पर्ध्यांचीं छकलें छकलें करून टाकण्याकरितां अधीर झाला होता.

× × ×

मी स्वतःला वाईट वाटून घेत माझा अज्ञातवासाचा काळ अजित-बरोबर भेंडीबाजारच्या त्याच्या एका मुसलमान मित्राकडे काढीत होतों. कांहीं कामगार-मित्राच्या संभाषणानी अन् वर्तमानपत्राच्या रकान्यांनीं शहरांत पसरलेलं भलं मोठं आन्दोलन माझ्या मनावर आनन्दाच्या लाटा उठवीत होतं पण माझी त्यात प्रत्यक्षपणें भाग घेण्याची अन् आटो-काट प्रयत्न करून त्याला हातभार लावण्याची मनीषा जागच्याजागी विरत होती. हिंदुस्थानच्या दुसऱ्या काही प्रमुख शहरातून धरपकड चालूच होती. विद्यार्थी-कार्यकर्ते पकडले गेले होते आणि आता ही सर्व जबाबदारी अज्ञातवासी कम्युनिस्टांवर येऊन पडली होती.

पण मला माझ्या अज्ञातवासाची भिती वाटत होती. कारण कोणी-तरी माझ्या पाळतीवर होतं हे निश्चित. मी अजितला ‘ आपण फारच लक्षपूर्वक वागलं पाहिजे. ’ असं बजावून सागितलं होतं. पण तो म्हणत होता, ‘ आतां ह्या सुरू झालेल्या आन्दोलनात प्रत्यक्ष काम करणारे कार्य-कर्तेच सरकारच्या डोळ्यात जास्त खुपत आहेत अन् त्यांनाच अगोदर तुरुंगात खेंचले जाईल. आपल्यापर्यंत पाळी फारच लांबची आहे. ’ कम्यु-निस्ट पुढाऱ्याची धरपकड सुरू होतांच कॉ. जयवंत आम्हाला येऊन मिळाला होता. आम्ही न धरल्या जाण्याच्या गोष्टी बोलत होतों तरी पण कोण कसा केव्हां धरला जाईल याबद्दल प्रत्येकजण साशंक होता.

× × ×

अजितचा चेहरा त्या रात्रीं मिणमिण करणाऱ्या ज्योतींत सुकून गेलेला दिसत होता आणि जयवंत आपल्या अंगावरील कपडे न काढतांच

त्या लहानशा खोलींत लांबलचक पाय पसरून आढ्याकडे उगाच कांहीं तरी बघत पडला होता.

अजित माझ्याजवळ येऊन म्हणाला, ' जयंत, बघितलं अशा नाउमेदीचे क्षण आपल्या आन्दोलनांत येतात पण आपण पुष्कळ मिळविली. शास्त्रांच्या इतिहासांतून कार्यतत्परतेच्या इतिहासापर्यंत आपण केवढी मजल मारली ! '

त्याच्या किंचित्‌शा उत्साहाच्या भावनेला जोर देण्याच्या उद्देशानं मी म्हणालों, ' रामगढ कॉंग्रेस अधिवेशनानं आम्हांला सपशेल नाउमेद बनविलं आहे. अशी संधि पुन्हा मिळणार नाहीं. आम्ही स्वतः जेव्हा नगारा वाजवितो तेव्हा हे लोक अहिंसेचा उदो उदो करून अन् सामुदायिक सत्याग्रहाला विरोध करून वैयक्तिक सत्याग्रहाच्या अटी पुढे टाकतात. याचा अर्थ एवढाच की, आमच्या देशाच्या दुर्दैवानं दैनंदिन आर्थिक जीवनाच्या उपासमारीचा विचार एका ठराविक शास्त्रशुद्ध विचारावर करायला येत नाहीं. '

' जयंत, ते तर मला अशक्य वाटतं. आता बघ ना आपण येवढा मोठा उभारलेला संप अन् त्यावर उभारलेले मनोरथ ढासळलेच की नाहीं ? '

' अजित, याला उपाय एकच-या क्षणाचा फायदा घेऊन पुढचा क्षण मौल्यवान् बनविणं हाच होय. आमच्या बौद्धिक प्रचाराशिवाय अन् अखंड नि अविरत कार्य केल्याशिवाय ती समाजसत्तावादी इमारत गाठणं शक्य नाही. आजचे हे संप अन् प्रचंड कामगार बंधुभगिनीची एकजूट आमच्या पुढच्या भावी आकांक्षा मजबूत करायला पुरेशी आहे. '

पण थोड्या वेळात कॉ. जयवंत आपल्या जागेवरून उठला नि म्हणाला, ' अजित, हे बघ, आता मला येथून निराळ्या ठिकाणावर जाण्याची सूचना मिळाली आहे. संपाची लाट आता ओसरून गेली आहे. आपण कितीही प्रचार केला अन् सभा भरविल्या तरी पुढाऱ्याचं वजन कामगारावर मुळीच राहिलेलं नाहीं. तसेंच ज्या योगे चळवळीला जोर चढला होता ती परिस्थिति पण आता शिल्लक उरलेली नाही आणि दुसरी गोष्ट अशी कीं काहीं काहीं कामगार-पुढारी अन् कार्यकर्ते एकाएकीं बंदिस्थ झाल्यामुळं त्यांचे कामगारातले संबंध वगैरे कळायला मुळीच वाव नाही. तरी पण विभासहि अज्ञातस्थळी गेला आहे अन् तो शेवटपर्यंत अज्ञातस्थळी

राहील इतकी त्याच्यांत चिकाटी आहे. आणि मला वाटतं आता पार्टीचं सारं काम त्याच्यावर सोपविण्यात आलं आहे. सध्या नऊ कार्यकर्ते अज्ञातवासात आहेतच अन् धरपकड जास्त प्रमाणात सुरू झाली की आणखी बऱ्याच जणाना जावं लागेल. जयंत धरला जाईल अशी मला शंका येते. कारण त्याच्या पाळतीवर सारखा एका माणसाचा चेहरा मला दिसत असतो.'

अजित माझा खादा हलवीत म्हणाला, 'जयंत, असं कर ना, मी तुला माटुंग्याचा पत्ता देतो. तूं आताच्या आता तिकडे निघून जा अन् जयवत तूं कल्याणच्या मार्गाला लाग. मी हा येथून आता थोड्या वेळात काढता पाय घेतो. पण आपण तिघानी आठवड्यात तरी एका ठिकाणी भेटून चर्चा केलीच पाहिजे, काय काय राजकीय घटना घडत आहेत त्याची. मला तर वाटतं आपण तिघानीं आणखीन् चार दिवसानीं याच वेळेस येथून काही अंतरावर तो ओसाड बाग आहे ना तिथं येऊन भेटाव.'

असं म्हणून आम्ही तिघेही उठलो तोच आमच्या खोलीतला मुसलमान मित्र आत येत म्हणाला, 'यार अंधेरेमे बाते करते हो. दिया तो बुझ रहा है.'

अजित चिमणीजवळ जाऊन चिमणीतील वात उंच करीत म्हणाला, 'नही नहीं, जब तक हम है दिया नही बुझेगा!'

आणि तेथून निघताना माटुंग्याच्या निवासस्थळी जाईपर्यंत माझ्या कानात ते वाक्य घुमत होतं. 'नाहीं, नाही. कम्युनिस्ट क्रान्तीचा तो दिवा विझणार नाही. त्याच्यात आम्ही आमच्या कर्तव्याचं तेल ओतूं. लाखो नि लाखो मिळत जाणाऱ्या लोकाची अखंड एकजूट घडवून आणून त्या ज्योतीला अधिक प्रखर—अधिक तेजस्वी—बनवूं.'

---

## २०

नाशिकच्या जेलमधल्या उन्हाळया रात्रि फारच सुखद आणि थंड वाटत होत्या. एके दिवशी आम्ही सारे स्थगित झालेले कैदी उघड्यात येऊन बसलो होतो. माझ्याजवळ मार्क्सचं 'दास कॅपिटल' होत. प्रत्येक जण ते वाचून काढणार होता अन् वाचल्यानन्तर प्रदीप मालाणी त्यावर सतत काही दिवस अभ्यासमंडळ चालविणार होता. मीं तो ग्रंथ सतीश-जवळून मोठ्या हिकमतीनं काढून घेतला होता. मला तो पूर्णपणे अभ्यासू दृष्टीनं वाचावयाचा होता. पण प्रत्येकाला तशीच गरज भासत होती. 'मला अगोदर पाहिजे, मला अगोदर द्या' असा तेथे जमलेले सर्व कामरेड्स उच्च आवाज करूं लागले.

मी भोवताली नजर टाकली अन् आभाळात दृष्टि स्थिर केली. मला काही तरी विचार सुचला अन् मी सर्वांना उद्देशून म्हणालो, 'बर, एक प्रश्न सोडवाल? प्रत्येकान आपआपल्यापरी या वर आकाशातल्या सगळया काळयाकुट्ट भागावर एकाच ठिकाणी थोड्याशा चमकणाऱ्या चादण्याच वर्णन करावे. ज्याचं वर्णन उत्तम ठरेल त्याला हा ग्रथ पहिल्यादा वाचा-यला दिला जाईल!'

सगळयाना ही कल्पना पटली तर खरी, पण प्रदीप मालाणी माझ्या कानाशी येऊन म्हणाला, 'ह हं, जयत, अजून तुझं हे काव्याच वेड काही दूर होत नाही अन् तू ते केवढ बाड भरकटून काढल आहेस! अरे आता तरी सोड ना त्या बुर्झ्वा छोकरीचा नाद! म्हणे ती डेन अशी होती न् तशी होती. पण तुझी सहचरी असावरी इला घेऊन भावी कामगार क्रान्तीत तू कशा रितीनं काम करणार त्याच्यावर लिही ना एखादी आदर्श लेखमाला.'

प्रत्येकजण वर्णनावर वर्णन देऊ लागला अन् त्याला 'प्रतिगामी, ठराविक साच्याचं, काव्यप्रेमी, लहरी' वगैरे शब्दानं दुसरा खोडू लागला. विनयनं—जो सर्वांच्या लाब बसला होता—तेथूनच सुरुवात केली. 'वर अधारात आपल्या अण्डर ग्राऊण्ड कॉमरेड्सची मीटिंग होत आहे अन् त्याच्या तोडांतल्या अन् खाली पडलेल्या जळत्या सिगारेट्सची हे चमकणारे तारे म्हणजे थोटुकें आहेत.'

प्रदीप मालाणी बसल्या जागेवरून मोठ्यानं ओरडला, ' ब्रेव्हो ! मिळवलीस विनय ! ! '

अन् अशा रितीनं त्या दिवशीं विनयला पुस्तक द्यावं लागलं मला.

पण त्या रात्रीं मला काही सुचेना. प्रदीपचा शेरा माझ्या जिव्हारी लागला. वासना आणि कल्पना या प्रत्येक माणसाच्या दोन सख्या बहिणी आहेत. वास्तवतेत मनुष्याला जें मिळत नाहीं ते तो कल्पनेंत मिळवून घेतो.

माझ्याहि बाबतींत अशीच गोष्ट झाली. अजितकडून त्या दिवशीं भेंडीबाजारातून माटुंग्याला आलो. त्याच्या दुसऱ्या दिवशीं रात्रीं धरपकड झाली अन् माटुंग्याच्या निवासस्थानातून मला उचलण्यात आलं. पण त्याच्या आधल्या दिवशी असा मला भेटली होती अन् तिला मी सहचरी या नात्यान बांधून टाकल होतं. एखादी गुप्त गोष्ट हळूहळू सरकत सगळी-कडे फैलावते त्याप्रमाणं माझ्या साऱ्या मित्रांत हा विषय चर्चिला गेला. अजितला ही गोष्ट मी केव्हाच सागून टाकली होती. त्या वेळेस त्यानं आनदाने माझे हात दाबले अन् नदिनीकडे घरदार सोडलेल्या असाची केव्हाच तरतूद करून टाकली होती.

मी पुष्कळ विचार करून ठरविलं होतं. मला कळल, डेनच्या बाबतीत माझ आकर्षण वास्तवतेच्या साच्यातून आलेलं नव्हत. त्यात सहचरी या नात्यान तिच्याकडे बघण्याची माझी इच्छा नव्हती. पण मला ती प्रिय वाटत होती. तिनं मला आयुष्य, सुख, अन् जीवनविकास करायला योग्य तो वाव दिला होता. ज्याप्रमाणे शिरीनच्या भावनेचा शेवट त्या तशाप्रमाणे झाला होता, तसाच भावनेचा शेवट डेनशीं पण अशा तऱ्हेनं मला करावा लागला. आता माझ्या पुढच्या आयुष्यात डेन येणार नाहीं याची मला खंत होती. कारण ती सुखलोलुप अन् प्रदीप म्हणतो तशी पेटी बुर्झवा उच्च पाढरपेशा समाजाची एक घटक होती. एका ठराविक क्षेत्रापुरतं पोषाखी वृत्तीन काम करण्यापेक्षा तिच्यात धडाडी नव्हती. त्यापेक्षा दिलीपच्या कलोपासनेकडे ती अधिक ओढली जात होती.

पण असा ह्या दोघीपेक्षा किती भिन्न होती ! त्या रात्रीं वासनातीत प्रेम दोन जिवाना एक करतं हा सिद्धात मला पटला. असाचा त्याग, तिची त्या रात्रींची प्रशात वागणूक यानी माझ्या मनावर तिच्या सह-

चर्याची पकड घट्ट केली. मला तिच्या पहिल्या भेटीचा दिव्य क्षण आठवला. तो नाच अन् त्यात डेनचं स्थान! किती आनन्दायी होते ते क्षण! डेनची मित्रभावाची ओळख यावज्जीव विसरणं शक्य नाही. तिच्या त्या बेभान प्रेमानं दिपल्यामुळेंच तर मी हे सारं लिहून टाकलं.

कम्युनिस्ट क्रान्तीच्या शास्त्रात एका आन्दोलनाची चूक दुसऱ्या चळवळीत सुधारली जाते. माझ्या या राजकीय आन्दोलनापर्यंत व्यतीत झालेल्या जीवनाला निष्कारण प्रेमाच्या आन्दोलनात मनाला झोके देण अन् कल्पनेच्या काव्यानं शरीराला आळशी बनवून राजकीय आकाक्षाकडे जरा डोळेझाक करणं मूर्खपणाचं आहे असं मी समजलो. ज्या व्यक्तीला महत्तम अशी काम करायची आहेत त्यान एक निश्चित अशी विचारसरणी ठरवून आपली सहचरी शोधून काढावी किंवा या निष्कारण प्रेमप्रसंगातून त्यानं सहीसलामत आपली सुटका तरी करून घ्यावी अन् ही चूक मी सुधारून घेतली.

× × ×

मला कारावासात सतीशची उणीव भासत होती. प्रदीप, सतीश, विनय, अजय व माझी नाशिक जेलकडे रवानगी करण्यात आली होती ती रात्र मला आठवते. सतीश सर्वांना बजावून एकसारखा म्हणत होता 'अशा गोष्टी होणार हे ठरलेलच असतं पण आपण आपला उत्साह सोडायचा नाही. ही आम्हाला मिळालेली स्थगित कारावासाची शिक्षा साऱ्याना पुनः बाहेर पडताच एक प्रचंड चळवळ माजविण्यास कामास येईल.' आणि तो पुढे म्हणाला, 'हे सर्व कैदखाने म्हणजे राजकीय धडे घेण्याकरिता आणि पुढचे सग्राम लढविण्याकरिता उभारलेली विश्वविद्यालयेच आहेत. समाज आणि कम्युनिस्ट दोन नाहीत. पण ही दोन नाहीत हे जास्त प्रमाणात दाखविण्याकरिता केवढ्या तरी कार्याची आवश्यकता आहे.' सारीच्या सारी जनता या महत्तम कार्याकडे ओढली जाण्याकरिता त्यान किती तरी कार्यक्रम दाखविले!

पण मला वाटतं नाशिक जवळच्या एका स्टेशनवर एक पोलिस सुपरिंटेन्डन्ट आत आला अन् एकट्या सतीशला, आम्हाला न सागताच दुसऱ्या

तुरुंगात पाठविण्याकरिता त्याला बाहेर निघण्याची त्यानं विनन्ति केली.

× × ×

गाडीचं एन्जिन भक्‌भक् धूर फेकीत होतं. मी अधीर मनानं खिडकीच्या बाहेर मान टाकून सतीशला विचारलं, ‘सतीश, युद्धाचं वारं बदललं तर आपण पुन्हा भेटूं काय रे ?’

सतीश त्या एन्जिनच्या रोखानं किलकिले डोळे करीत म्हणाला, ‘ते काही निश्चित नाही. युद्धाचं स्वरूप बदललं अन् समजा रूसो-जर्मनयुद्ध सुरू झालं अन् रशियानं ब्रिटनची मैत्री स्वीकारली तर कदाचित् शक्य आहे.’

गाडी शीळ देत होती पण तो बोलू लागला, ‘कदाचित् आपली सुटकाहि होणार नाही. कारण भांडवलदार आणि मजूर यांचा लढा हा अखिल जगतातल्या राष्ट्रांचा प्रश्न आहे अन् समजा उद्यां त्यांनी आपल्याला सोडलं तरी मजुरांच्या न्याय्य मागण्या मिळवून घेऊन राजकारणाकडे जायला आपण थोडेच विसरूं ? या ना त्या प्रकारें तसली आन्दोलनं उभारावीच लागतील अन् त्यामुळं सध्याच्या युद्धाचं उत्पादन बन्द पडेल हा प्रमुख प्रश्न हिन्दी सरकारपुढं प्रामुख्यानं येईल अन् म्हणून मला वाटतं......’

गाडी चालू झाली. सतीशला बऱ्याच अंतरापर्यंत हात दाखवीत आम्ही खिडकींतून बाजूला झालों.

डब्यात जागेवर बसल्यानन्तर मी प्रदीपला प्रश्न केला, ‘प्रदीप, लोकोमोटीव्ह एंजिनमध्यें केवढी मोठी प्रचंड शक्ति असते रे ?’

प्रदीप हातातलं ‘Light On Moscow’ हे पुस्तक बाजूला सारीत म्हणाला, ‘कामगारवर्गाचा लढा हाहि अगदी याच लोकोमोटीव्ह एन्जिनसारखाच आहे. तो प्रचंड वेगवान् कामकरी वर्ग आपल्या पोलादी बुद्धीनं अन् विचारांच्या बाष्पीभवनानं जगातल्या साऱ्या प्रतिगामी शक्तींना एकवटून पुढे, पुढे अन् पुढें नेत असतो.’

